ी देवी होआ :
त्र – एकांक )
रसूत्र )

थोर ! '

—शिवबास ( आचारस्थळ )

" आन काठिण्यता चुकवोनी सकळांसी अल्पायासें ब्रह्मविद्या चिये ठाये गिवसतां येवौनि परमेश्वर लाभुद्यमा वावु होआवा: म्हणौनिचां महाराष्ट्रीये निरोपिलें की गा : "

( नागदेवाचार्यचरित्र : परशरामकृत )

---

## केशवसुत

विश्वाचा विस्तार केवढा ?
ज्याच्या त्याच्या डोक्याएवढा.

स्वमस्तकीं ज्याचा भार
तो नर कांही करणार.

पूर्वीपासुनि अजुनि सुरासुर
तुंबळ संग्रामाला करिती;
सम्प्रति दानव फार माजती,
देवांवर झेंडा मिरविती !
देवांच्या मदतीस चला तर !

जनकामागे जागृत । जननी गे तूं दैवत
कष्ट दिले तुजला मीं फार फार आई !
त्यांची मजकडुनि फेड जाहली न कांही !

# पराभवांचीं रहस्यें

[ मराठी वाङ्मय आणि संस्कृति याविषयी विचार ]

१

## महानुभावांचा पराभव

महानुभावांच्या अप्रियतेची मीमांसा

महानुभावांची व्यक्तिनिष्ठा

आणि

समाजनिष्ठ महाराष्ट्र

२

## केशवसुतांचा पराभव

केशवसुतांचें अंतरंग

अमृत परंपरा

: लेखक :

मुरलीधर मनोहर जाबडेकर

प्रकाशक :
प्रा. मु. म. जावडेकर
४९९, शनिवार पेठ,
मेहूणपुरा,
पुणें २.



शके १८८३






मुद्रक :
द. ग. गपचूप,
श्री शिवाजी प्रिंटिंग वर्क्स,
४९५-४९६ शनिवार पेठ,
पुणें २.

# प्रसिद्ध ग्रंथकार प्राध्यापक डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे

# यांची प्रस्तावना

गोविंदराम सक्सेरिया महाविद्यालयांतील तरुण प्राध्यापक श्री. मु. म. जावडेकर यांचे 'महानुभावांच्या अप्रियतेची मीमांसा' व 'केशवसुतांचें अंतरंग' हे दोन लहानसे प्रबंध पाहून मला फार आनंद झाला. समाधान वाटलें. या दोन्ही विषयांसंबंधीं श्री. जावडेकर यांनी रूढ मतांहून अगदी निराळें मत मांडलें आहे. आणि असें स्वतंत्र मत मांडतांना विषयाचा जो प्रपंच, जें संशोधन करणें अवश्य असतें तें सर्व त्यांनी केलें आहे. हें संशोधन त्यांनी इतकें करून केलें आहे की हा एक उदयोन्मुख नवा निबंधकार मराठींत दिसत आहे असें वाटावें.

महानुभावांनी चातुर्वर्ण्यावर आघात केला म्हणून महाराष्ट्रांत ते अप्रिय झाले, त्यांनी महाराष्ट्राचे शत्रु जे मुस्लिम राज्यकर्ते, त्यांच्याशीं संगनमत केलें व त्यांच्या सहाय्याने येथल्या देवाधर्मांवर अत्याचार केला म्हणून मराठी कवींचा त्यांच्यावर फार राग आहे, या पंथाचे आद्य प्रवर्तक जे श्रीचक्रधर त्यांच्या चारित्र्याविषयी लोकांत वदंता फार होत्या म्हणून तो पंथ मागे पडला, अशा तऱ्हेचे बरेच समज याविषयी विद्वानांत रूढ आहेत. पण जावडेकरांनी या सर्वांहून अगदी निराळें असें मत मांडलें आहे. महानुभावांची व्यक्तिनिष्ठा — म्हणजेच अतिरेकी समाजविमुखता — हीच त्यांच्या अपयशाच्या मुळाशीं आहे असें हें मत आहे. आणि हें सिद्ध करण्यासाठी महानुभावांच्या मूळ ग्रंथांतून अनेक अवतरणें त्यांनी दिलीं आहेत. समाजांत राहूं नये, प्रियजनांचा सहवास टाळावा, त्यांचें स्मरणसुद्धा होऊं देऊं नये, आपल्याशीं कोणी मैत्री करील, आपल्यावर लोभ करील म्हणून अत्यंत किळसवाणी राहणी असावी, प्रेतासारखें पडून राहावें असें सांगण्याइतका समाजद्वेष महानुभावांच्या वाङ्मयांत दिसतो. येवढ्यानेहि होत नाही. कोणाच्याहि कधीहि उपयोगी पडूं नये अशी त्यांची शिकवण आहे. मसणांतलें लाकूडसुद्धा लोकांच्या थोडें उपयोगी

पडेल. तितकेंहि आपण पडूं नये, नाही तर परमेश्वरप्राप्तींत विक्षेप येईल असें ते सांगतात. ही घृणास्पद समाजपराङ्मुखता हेंच त्यांच्या पराभवाचें मूळ कारण होय असें जावडेकरांचें मत आहे. हें पूर्वार्धांत सांगून उत्तरार्धांत, महानुभावांची अशी वृत्ति कां झाली याची कारणमीमांसा त्यांनी केली आहे. त्यांच्या तत्त्वज्ञानांतील द्वैतसिद्धान्त हा याच्या बुडाशीं आहे असा याविषयी त्यांचा निष्कर्ष आहे.

केशवसुतांवरील प्रबंधांतहि असेंच आतापर्यंतच्या रूढ मतांहून जावडेकरांनी अगदी निराळें, अगदी स्वतंत्र मत मांडलें आहे. केशवसुतांना इंग्रजी कवितेवरून स्फूर्ति झाली, ते मराठींतले वर्डस्वर्थ होते, शेले होते, ' गोल्डन ट्रेझरी 'च्या वाचनांतून त्यांना काव्यस्फुरण झालें अशीं मतें टीकाकारांनी मांडलीं आहेत. जावडेकरांनी हीं सर्व मतें त्याज्य ठरवून केशवसुतांची सर्व स्फूर्ति, त्यांची काव्यप्रेरणा त्यांनी वैदिक वाङ्मयांतून, प्रत्यक्ष वेदांतून घेतलेली आहे, त्या अमृतपरंपरेंतील ते एक कवि आहेत असें प्रतिपादन केलें आहे. आणि यासाठी वेदांतील ऋचा, सूक्तें व केशवसुतांची कविता यांतून त्यांनी इतकीं अवतरणें दिलीं आहेत की या निराळ्या दृष्टिकोनाची दखल घेतलीच पाहिजे असें कोणत्याहि प्रौढ व सुप्रतिष्ठित टीकाकाराला वाटल्यावांचून राहूं नये. केशवसुतांचें सृष्टिप्रेम, निसर्ग हाच नीतीचा आधार हें मत, द्यावापृथ्वीचें ऐक्य, परमेश्वर देवळांत नसून सृष्टि हें त्याचें देऊळ आहे ही कल्पना, जगद्रुमाचा विचार, ऐंद्रियज्ञानापलीकडच्या तत्त्वाविषयीची त्यांची जिज्ञासा, अंतिम सत्याविषयीची तळमळ, इतकेंच नव्हे तर रूढीवर हल्ला करण्याची त्यांची वृत्ति हीसुद्धा वैदिक परंपरेंतून आलेली आहे आणि यावरून केशवसुतांचा आत्माच वैदिक आहे असा विचार जावडेकरांनी मांडला आहे. आणि कोणालाहि आपल्या आजपर्यंतच्या मताचा फेरविचार करण्यास भाग पाडील इतक्या दृढपणें तो मांडला आहे.

आरंभीं म्हटलें आहे की जावडेकरांनी संशोधन केलें आहे. आणि या प्रबंधांतील मला कौतुकास्पद भाग वाटला तो तोच होय. एक नवा विचार मांडतांना किती कष्ट करावे लागतात, आधारप्रमाणें मुळापर्यंत जाऊन कशीं तपासावीं लागतात, त्या विचारावर येणाऱ्या संभाव्य आक्षेपांची कल्पना करून त्याला उत्तरें कशीं द्यावीं लागतात याची लेखकाला चांगली कल्पना आहे. आणि नव्या प्रतिपादनाला अवश्य असलेला हा सर्व खटाटोप त्याने केला

आहे. केशवसुतांचा आत्मा वैदिकच आहे असें म्हणतांच त्यांची कविता आणि वेद यांतील साम्यस्थळें हुडकून काढणें, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, बाळशास्त्री हरदास, रॅगोजिन यांसारख्या पंडितांची मतें पाहणें, त्यांचा आधार घेणें, रूढ मताचे पुरस्कर्ते प्रा. जोग, श्री. माडखोलकर यांच्या प्रतिपादनांतील वैगुण्यें शोधून काढणें, त्यांच्याविरुद्ध आपलें मत साधार उभें करणें हा सर्व उद्योग करणें अवश्य झालें. आणि तो जावडेकरांनी निरलसपणें केला आहे. संशोधन-वृत्तीचे अंकुर त्यांच्या ठायीं आहेत असें म्हणण्यापुरता विसार या उद्योगाने जावडेकरांनी निश्चित दिला आहे.

त्यांच्या प्रतिपादनास पूर्णता येण्यासाठी आणखी एकदोन गोष्टी करणें अवश्य आहे असें वाटतें. त्यांचा उल्लेख करून ही प्रस्तावना संपवितों. महानुभावांच्या समाजविमुखतेचें विवेचन करतांना त्यांनी वारकरी, रामदास या इतर पंथांतील संतांच्या समाजहिततत्परतेचा तुलनेसाठी विचार केला आहे. तो अवश्यच होता. त्यावांचून मूळ प्रतिपादनच लंगडें पडलें असतें. पण आणखी एक गोष्ट करावयास हवी. महानुभावांची व्यक्तिनिष्ठा किंवा समाज-द्वेष हा दाखविण्यासाठी त्यांनी त्यांच्या ग्रंथांतून जीं अनेक वचनें दिलीं आहेत तशींच, त्या अर्थाचींच अनेक वचनें वरील इतर पंथीय संतांच्या ग्रंथांतहि सापडतात. त्यांचा विचार करून त्या संतांच्या समाजप्रेमाशीं त्यांचा समन्वय साधणें हें अवश्य आहे. त्यावांचून हें विवेचन अपुरें राहील. त्याचप्रमाणे केशवसुतांचा आत्मा वैदिक होता हें म्हणतांना इंग्रजी वाङ्मयाचे, पाश्चात्य विद्येचे, परंपरेचे, संस्कृतीचे ते कोणत्या अर्थानें ऋणी होते हेंहि थोड्या तप-शिलाने दाखविलें पाहिजे. नाही तर दुसऱ्या टोकाला गेल्यासारखें होईल. आणि मग तें तितकेंसें टिकणार नाही.

अशीं एकदोन वैगुण्यें दिसलीं तीं सांगितलीं, मात्र तीं प्रतिपादनाच्या मूळ बैठकीला मारक आहेत असें नाही. अवश्य ते मूळ संहितांतले सर्व आधार, पंडितांचीं प्रमाणें, तर्कशुद्ध विचारसरणी आणि विचारांची सुव्यवस्थित मांडणी यांनी जावडेकरांनी ही बैठक भक्कम केली आहे. ज्यांच्या मतांवर त्यांनी टीका केली आहे ते पंडितहि यासाठी त्यांचें अभिनंदन करतील असें वाटतें.

पु. ग. सहस्रबुद्धे

## महामहोपाध्याय विद्यानिधि
## श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचा अभिप्राय

श्री. मु. म. जावडेकर यांनी लिहिलेले महानुभावांच्या अप्रियतेची मीमांसा, महानुभावांची व्यक्तिनिष्ठा आणि केशवसुतांचें 'अंतरंग वगैरे लेख माझ्या वाचण्यांत आले. त्यांत मला पुष्कळच नाविन्य वाटलें. केशवसुतांसंबंधी लिहितांना त्यांचें अंतरंग त्यांच्याच शब्दांत दाखविण्याचा प्रयत्न मला विशेष आकर्षक वाटतो. केशवसुत हे आधुनिक कवींपैकी आद्य कवि होत. त्यांनी आधुनिक कवितेची भव्य बैठक, स्थिर पायावर उभारली. साहजिकच त्यांचें शिक्षण, योग्यता, स्फूर्तिस्थानें इत्यादींचें संशोधन आधुनिक परिचित मोज-मापाने होणें अगदी स्वाभाविक आहे. पण तसें करतांना आपल्या मनाची घडण कशी झालेली आहे इकडे अगदी दुर्लक्ष होतें, आणि भलभलते तर्क सिद्धान्त म्हणून आग्रहाने मांडले जातात. अशा कांही अपसिद्धान्तांचें खंडण करण्याकरिताच ' अंतरंग ' स्पष्ट करण्यांत आलें आहे. केशवसुतांची स्फूर्ति वदिक वाङ्मयाच्या अभ्यासांतून निर्माण झालेली आहे हें स्पष्ट करण्यांत लेखकाला पूर्ण यश आलेलें आहे. अनेक साम्यस्थळांचा निर्देशच केलेला असल्यामुळे त्याबद्दल शंका राहत नाही. बाहेरच्या प्रेरणा कितीहि प्रभावी असल्या तरी आमची मानसिक घडण इतकी प्रभावी आहे की सर्वांना पचवून ती प्रभावी झाल्याशिवाय राहत नाही. याबद्दल लेखकाने नवी दृष्टि स्वीकारली, कोणीं मांडला नव्हता असा नवा मुद्दा सप्रमाण अभ्यासकांपुढे ठेवला आणि प्रमाणेंहि कोणीहि तपासून पाहावींत अशा स्वरूपांत घासूनपुसून लोकांपुढे ठेवलीं याबद्दल धन्यवाद द्यावेत असें वाटतें.

दि. ३०।५।६१
पुणें

—सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

## अनुक्रमणिका

'महानुभाव तत्त्वज्ञान', 'महानुभावांचा आचारधर्म' इत्यादि ग्रंथांचे लेखक प्राचार्य डॉ. कोलते यांचें पत्र

नागपूर
२।१।५८

श्री. जावडेकर

स. न. वि. वि. आपण पाठविलेले दोन्ही लेखांक मिळाले. आपण केलेली मीमांसा बरीच पटण्यासारखी आहे. दोन्ही लेख एकत्र वाचून मी पुन्हा केव्हा तरी यासंबंधी आपणाला लिहीन. लेखाची कात्रणे पाठविल्याबद्दल फार आभारी आहे. कळावे.

आपला
वि. भि. कोलते

# लेखकाचे चार शब्द

रसिक आणि चिकित्सक अशा मराठी वाचकांच्या हातीं हें पुस्तक देतांना मला आनंद होत आहे. कारण त्यांना तें आवडेल असा विश्वास वाटतो. अर्थात् आवडलेंच पाहिजे, असा आग्रह नाही. पुढे जे कांही विचार मांडले आहेत त्यांहून वेगळें कांही सिद्ध केलें जाईल तर तें समजावून घेण्यांत मला आनंद होईल. पुढील लिखाणांत कुणा व्यक्तीवर टीका नाही. महानुभावांची तळमळ आणि केशवसुतांच्या टीकाकारांचा अभ्यास याविषयी कुणालाहि अतिशय आदरच वाटेल. सुखार्थ्याला ज्ञान कुठलें, असें आपण म्हणतोंच. महानुभावहि तेंच म्हणतात. तसेंच केशवसुतांच्या टीकाकारांनी त्यांचें महत्त्व प्रस्थापित करून मोठेंच कार्य केलें आहे. महानुभाव आणि केशवसुत या दोन्ही विषयांसंबंधी अजून खूपच लिहिण्याजोगें आहे.

अनेक ग्रंथकारांचा उल्लेख केलाच आहे. त्या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहें. अप्रत्यक्षपणेंहि अनेक ग्रंथकार उपयोगी ठरतात; त्यांचाहि मी आभारी आहें. डॉ. कोलते यांच्या ग्रंथांतील उतारे मला हवे होते; म्हणून त्यांना माझे मित्र श्री. महेश जोशी यांनी विचारल्याबरोबर त्यांनी कसलीहि हरकत न घेतां परवानगी दिली, आणि लेख वाचून ताबडतोब मत कळविलें, याबद्दल त्यांचे किती आभार मानावेत! गुरुवर्य डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी मुद्दाम वेळ काढून प्रस्तावना लिहून दिली! त्यांचे आभार मानायचे म्हणजे त्यांच्या अभिरुचीस उतरेल असें आणखी कांही तरी नवीन लिहायला पाहिजे! महामहोपाध्याय चित्रावशास्त्री यांच्या सुंदर भाषांतरांचा मला केवढा उपयोग झाला! त्यांनीच आस्थापूर्वक अभिप्राय लिहून दिला, हें माझें भाग्यच. इतरहि अनेक प्राध्यापकांनी आणि विचारवंत मित्रांनी माझे लेख मुद्दाम वाचले; त्यांचाहि मी आभारी आहें.

आमचे आजोबा ती. रा. रा. शंकर हरी जावडेकर यांनी जनसेवेचें आणि ज्ञानप्रेमाचें उदाहरण आम्हांला घालून दिलें आहे! आमच्या आईचे वडील ती. रा. रा. श्रीधर गणेश मणेरीकर हे तर अक्षरशः सतत ग्रंथवाचन, चिंतन करीत असतात. मीं न मागतां या वेळीं मोठीच रक्कम त्यांनी मला दिली, म्हणूनच हें पुस्तक या वेळीं प्रसिद्ध होऊं शकलें.

' शिवाजी ' मुद्रणालयाचे चालक श्री. गपचुप यांनी मुद्रणकार्य किती सुरेख केलें आहे हें सर्वांसमोर आहेच! माझ्या सोयीने घेऊन त्यांनी आपल्या अनुभवाचा लाभ मला दिला हें विशेष.

अशा रीतीने अनेकांच्या शुभेच्छांमुळेच हें लहानसें कार्य माझ्या हातून घडलें आहे. यांत माझें काय आहे ? ज्या कांहीं चुका असतील त्या माझ्या आहेत. जे कुणी त्या दाखवतील, त्यांचा मी आभारी होईन.

— लेखक.

— १ —

# महानुभाव

## ( पूर्वार्ध )

# महानुभावांच्या अप्रियतेची मीमांसा

महानुभावांच्या पराभवाची मीमांसा आजपर्यंत कांही थोडी झालेली नाही; तरी पण प्रस्तुत चर्चेवांचून ती पुरी होईल असें वाटत नाही हें नम्रपणें सांगावेंसें वाटतें. महानुभावांचा पराभव ही महाराष्ट्र–संस्कृतींतील अत्यंत भव्य अशी शोकान्तिका आहे. महानतेचा अधःपात—Downfall of the great—हें शोकान्तिकेचें लक्षण यशाच्या दृष्टीने—नैतिकतेच्या नव्हे—महानुभावपंथास तंतोतंत लागू पडतें. महानुभाव हा पंथ खरोखर पाहतां इतका मोठा आहे कीं, त्याच्या अभ्यासावांचून महाराष्ट्रसंस्कृतीचा अभ्यास पुरा होणार नाही. मराठी भाषेवर आणि महाराष्ट्र देशावर उत्कट प्रेम करून किती तरी गोष्टी त्यांनीच प्रथम मराठी भाषेंत मांडल्या आणि मराठी भाषा दूरवर पोंचविली. ज्ञानेश्वरांची थोरवी ही कीं, परमार्थामध्यें चातुर्वर्ण्याचें महत्त्व त्यांनी कमी केलें आणि स्त्री-शूद्रासहित सर्व वर्णांना त्यांनी नामस्मरणाचा सोपा आणि सुंदर महामंत्र दिला. या त्यांच्या कार्याबद्दल सर्व महाराष्ट्र त्यांना ‘ माउली ’ म्हणून संबोधतो. महानुभावपंथसंस्थापक चक्रधरांनी नेमकें हेंच कार्य आणि तेंहि ज्ञानेश्वरांच्यापूर्वी पाव शतकाहून अधिक काळ प्रकट-पणें करण्यास सुरुवात केली होती.

महानुभाव तत्त्वज्ञानांत स्पष्टपणें सांगितलेलें आहे कीं, “ युगधर्मक्रिया अथवा पुण्यहेतु याव्यतिरिक्त उगीचच एखादी वस्तु पवित्र व दुसरी अपवित्र मानणें, छीछी-थूथू करीत एखाद्या वस्तुविषयी मनांत किळस आणणें किंवा व्यक्तिविषयी विचिकित्सा करणें, हा विचिकित्सारूप विकल्प प्रतिदेहारंभक होय. त्याने प्रति-

देह आक्षेपतो. कारण, अशा विचिकित्सेमुळे मनुष्य स्वतःला श्रेष्ठ मानून इतरांना तुच्छ लेखतो. त्यामुळे सर्वत्र व्यापून असलेली अजड माया दुखावली जाते आणि म्हणून प्रेतत्व भोगावें लागतें. ''

याच तत्त्वज्ञानास अनुसरून ' चारहि वर्णांच्या घरीं घर न निवडतां निर्हेतुक भिक्षा करावी ', असें महानुभाव आचारधर्मांत म्हटलेलें आहे ( नवप्रकरण ८२ ). नामस्मरणाचे फायदे पुढीलप्रमाणे दिलेले आहेत. ' नामस्मरणानें जीवांना सर्व कांही मिळूं शकतें. त्यामुळे साधकाला वेध होतो, बोध होतो, अनुसरण घडतें, स्मरण उत्तम रीतीने करतां येतें, त्याचे सगळे विरोध नाहीसे केले जातात, त्याच्यावरचा ' वाजनवारा ' आणि ' पडतें आकाश ' थोपवून धरलीं जातात, त्याच्यावर येणारें विघ्न निवारलें जातें, त्याला त्याच्या आचारधर्मांत साह्य मिळतें आणि शेवटीं ईश्वरप्राप्ति होते...नामस्मरणाने श्रीमूर्तीच काय, पण ईश्वराचें अव्यक्त स्वरूपहि प्राप्त होतें, इत्यादि '. ( नामस्मरण करावें नामी अभिमानु आति ॥ ४६ ॥ आचारमालिका ).

चक्रधरांनी आपल्या या तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्यास सुरुवात करतांच त्यांना अनेक अनुयायीहि मिळूं लागले होते. पण ज्ञानेश्वरांचा उदय होतांच त्यांचा पंथ भराभर वाढूं लागला आणि काळाच्या ओघांत महानुभावांची पुरी पीछेहाट झाली. महानुभाव अप्रिय झाले आणि मागें पडले, याविषयीं वाद नाही. ही गोष्ट अर्थातच आपोआप झालेली नाही.

या घटनेच्या कारणांचा अभ्यास आरंभींच निर्दिष्ट केल्याप्रमाणे अनेकांनी केलेला आहे. त्यांचा पुनरुच्चार येथें करावयाचा नाही. फक्त प्रस्तुत चर्चेस आवश्यक अशा मुद्द्यांचा उल्लेख येथे होईल. अनेक विद्वानांच्या मतें, महाराष्ट्राच्या मनांत महानुभावांच्याविषयी फार मोठे गैरसमज होते व ते दूर न झाल्यामुळे महानुभावपंथ अप्रियच राहिला. हें म्हणणें प्रथम विचारास घेऊं. शतकानुशतकें एखादा गैरसमज चालू राहील असें वाटत नाही. एकनाथांसारखा बुद्धिमान्, बहुश्रुत आणि सर्व भूतमात्रावर प्रेम करणारा संत, तुकारामांसारखा उपेक्षितांस जवळ करणाऱ्याला देवपद देणारा महात्मा, भावार्थावर समाधान न होऊन यथार्थ शोधणारा पंडित वामन, ' मना बोलणें नीच सोशीत जावें ' या शिकवणींत मुरलेले गिरिधर, हे जेव्हां महानुभावांवर मनापासून हल्ला चढवितात, त्या वेळीं तो ऐकीव, अपुऱ्या माहितीवर विसंबून करीत असतील, असें मानणें

मनास रुचत नाही. नकळत जरी हातून अन्याय घडला असें वाटलें असतें तर या लोकांना केवढी खंत लागून राहिली असती ! पण आपली चूक होत नाही अशीच त्यांची खात्री असली पाहिजे. त्यांनीं महानुभावांवर कोरडे-ओढले ते जाणीवपूर्वकच असले पाहिजेत.

महानुभावांचें महत्त्व पाहतां हा प्रश्न अत्यंत जिव्हाळ्याचा आहे असें कोणाहि विचारी माणसास वाटल्यावांचून राहणार नाहीं. याचें कारण शोधण्यासाठीं अर्थातच सबंध महाराष्ट्राच्या संस्कृतीची पाहणी करणें जरूर आहे. कारण महानुभावपंथ हा अगदीं एकीकडे पडला पण महाराष्ट्रांतील इतर सर्व प्रमुख पंथांत फार मोठा सलोखा प्रथमपासून नांदत असल्याचे वरवर पाहणारासहि दिसून येतें. भागवतपंथ किंवा वारकरी संप्रदाय हा महाराष्ट्रांतील सर्वांत मोठा पंथ होय. त्यास नाथपंथांतील ज्ञानेश्वर आणि त्यांचीं भावंडें, दत्तसंप्रदायांतील एकनाथ, चैतन्यसंप्रदायांतील व ' रामकृष्णहरि ' हा मंत्र उच्चारणारे तुकाराम, रामदासी संप्रदायाचे प्रवर्तक रामदास, या सर्वांनी प्रेमाने अभिवादन केलें आहे. या सर्वांचे एकमेकांशीं जे संबंध होते त्यावरून महाराष्ट्राचें प्रेमळ व अव्याज मनच दिसून येतें. पण महानुभावपंथ यापासून अलग राहिला !—कां ? तो आपण होऊन दूर राहिला कीं त्यास दूर ठेवण्यांत आलें ? आणि तें कां ? महानुभावांचा प्रेमावर काय कमी भर होता ? ' ज्ञानापसि प्रेम उत्तम ' असें त्यांचें वचन आहे ! ( विचारमालिका ३० ). हें सर्व लक्षांत घेतां हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे आणि आपल्या संस्कृतीशींच तो निगडित आहे याविषयीं कोणासहि शंका उरेल असें वाटत नाही.

अशा रीतीने हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा व गहन दिसला तरी त्याचें उत्तर फक्त एका शब्दांत देतां येण्याजोगें आहे, आणि तें म्हणजे 'व्यक्ति-निष्ठा'. महानुभावपंथ हा व्यक्तिनिष्ठ पंथ आहे म्हणून त्याचा पराभव झाला. महाराष्ट्रांतील इतर सर्व वर उल्लेखिलेले प्रमुख पंथ हे समाजनिष्ठ आहेत. एखाद्या तत्त्वज्ञानाचा विस्तार कोणत्या कल्पनेभोंवतीं केलेला असतो, यावर त्या तत्त्वज्ञानाची निष्ठा सांगितली जाते. महानुभावपंथाचें तत्त्वज्ञान ' व्यक्ति ' या मध्यवर्ति कल्पनेभोंवतीं रचलेलें आहे, तर इतर सर्व पंथ आपलें तत्त्वज्ञान मांडीत असतांना सबंध समाजाचा विचार करीत असतात. महानुभावांपैकीं कोणास या व्यक्तिनिष्ठेची जाणीव होती असें

निश्चितपणें सांगतां येत नाही. पण त्यांचें तत्त्वज्ञान व्यक्तिनिष्ठ आहे, हें प्रस्तुत लेख वाचल्यावर कोणासहि पटेल. नेणिवेने कां होईना, एखादी गोष्ट होऊन गेली असेल तरी तिचें स्वरूप पाहून तिचें अंतरंग शोधणें कठीण नाही. तेंच या लेखांत करावयाचें आहे. वस्तुतः यांत कठीण कांहीच नाही. साऱ्या गोष्टी कशा सूर्यप्रकाशासारख्या स्पष्ट आहेत. अर्थातच व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाजवाद या अर्वाचीन कल्पनांची या ठिकाणीं गल्लत करण्याचें कांहीच कारण नाहीं.

आयुष्य कसें कंठावें यासंबंधीं उद्धवगीतेंत निःसंदिग्धपणें म्हटलें आहे; " संसारत्रस्त अनुतापीः जो एकला जन्म क्षेपीः तो मोक्षाचा निक्षेपीः संपन्नु होए." या ठिकाणचा ' एकला ' हा शब्द व्यक्तिनिष्ठावाचक आहे. तसेंच दुसऱ्या एका ठिकाणीं, " बाइ : ऐसा एकला पळपळीत निगे : जो दुःख-पूर्वक आपुलेया देवाते आठवीत वर्तेः ( आचारमालिका २१६ ) " त्याच्या दुःखाने पापें नष्ट होतात असें सांगतांना ' एकला ' हा शब्द मुद्दाम घालून व्यक्तिनिष्ठेवरच भर दिला आहे. ही व्यक्तिनिष्ठा निरनिराळ्या रूपांत महानुभावपंथांत सर्वत्र दिसते. ती इतकी कीं, तिला सर्वांगीण म्हणावयास कांहीहि हरकत नाहीं. हें कसें तें क्रमाक्रमाने पाहूं.

या व्यक्तिनिष्ठेमुळे महानुभावांना समाजसंपर्क मुळींच नको असतो. ' कोणी-कडून तरी आपलें परमेश्वरसाधन पूर्ण व्हावें याच गोष्टीकडे साधकाचें लक्ष पाहिजे, ' असें मुंगीच्या पुरुषाचें वर्णन करतांना सूचित केलेलें आहे. ( जन्म-जीवित परमेश्वरा देयावें ॥ ६८ ॥ नवप्रकरण ). देहविद्यावंताचें वर्णन करतांना व्यक्तिनिष्ठा उघड झाली आहे. ' देहविद्यावंताचें साधन व साध्य देहच असल्या-मुळे तो आपल्या सुवर्णमय वज्रदेहाशीं पूर्णपणें तादात्म्य पावतो. ( एकाकार वृत्ति उरे : विचार ३९ ). आपल्या देहाशीं एकाकार झाल्यामुळे इतरांच्या संग-तीची त्याला आवश्यकताच वाटत नाही. अर्थात् त्याला स्त्री वगैरे कोणीच नसतें. चारपांच देहविद्यावंत मिळून एकत्र राहतात असेंहि नाही. तो पूर्णपणें निःसंग बनून स्वेच्छेने अष्टभैरवांच्या स्वरूपावधींत वाटेल तेथें राहतो '. परमे-श्वराचा सहवास — ' सन्निधान ' — असणें म्हणजे काय याचें वर्णन केलें आहे तें पूर्णपणें समाजनिरपेक्ष आहे आणि सर्वसंगपरित्याग ही त्यांत एक आवश्यक गोष्ट म्हटलेली आहे. भक्ताचें वर्णन करतांनाहि ' भक्त हा आपल्या प्रेमदात्या

परमेश्वरावताराच्या ठिकाणीं पूर्णपणें बेचलेला असतो ( वित्तः वित्तः कायाः इए तिन्ही परमेश्वरासि अर्पावी ॥ २१८ ॥ आचारमालिका )' म्हणजे जगाचा व त्याचा कांही संबंध नसतो असेंच पर्यायाने सांगण्यांत आलें आहे. परमेश्वर-प्राप्ति हें महानुभावांचें ध्येय. तें साध्य होण्यासाठीं जो आचारमार्ग अनुसरावा लागतो त्याला ' असती परी ' म्हणतात. तिचा मुद्रितार्थ असा कीं, ' विकार-विकल्पशून्य होऊन व स्वभावाला मात्रा देऊन त्याने ( म्ह. साधकाने ) पर-मेश्वराव्यतिरिक्त इतर सर्व जडचेतन पदार्थांचा आश्रय सोडून निरालंब व्हावें आणि परमेश्वराचें स्मरण करीत करीत जन्मजीवित कंठावें. ( पहा, आचारस्थळ सूत्र १ लापिका )'.

" असती परी 'चा हा मुद्रितार्थ लक्षांत आणला म्हणजे परमेश्वरानुसरणाच्या कल्पनेंत सगळा आचारधर्म अंतर्भूत झालेला असल्याचें सहज लक्षांत येईल.' याचाच तपशील ' स्वदेशसंबंध त्याज्य ', ' स्वग्रामसंबंध त्याज्य ', ' संबंधिये त्याज्यः संबंधियांचा संबंधु तो विशेषता त्याज्य ' ( आचारस्थळ-सूत्र १ ) इत्यादि सूत्रांत देऊन ' धर्म म्हणजे समाजाचा त्याग ' हें कोणाच्या लक्षांत आलें नसेल त्याची सोय केली आहे. हा त्याग शरीरानेच नव्हे, तर मनानेहि करावयाचा असतो. ( दुरूनिही अंतःकरणीं नाठवावें ). यांचें विवेचन मोठें पाहण्याजोगें आहे. " या सर्वांचा त्याग करणें आचरत्या पुरुषाचें कर्तव्यकर्म होय. ...कारण या संबंधीयांच्या सान्निध्यांत असतांना आचारधर्म नीट रीतीने पाळला जाऊं शकत नाही; आचार आचरण्याचा अधिकार राहात नाही. ( संबंधी अधिकारु नाही – आचारस्थळ सूत्र २ ). जे निषेध चुकवायला पाहिजेत ते चुकवतां येत नाहीत आणि जे विधि पाळायला पाहिजेत ते पाळतां येत नाहीत. त्यांच्या सान्निध्यांत आचरत्या पुरुषाला प्रेमाचे उपाय करतां येत नाहीत, शास्त्राध्ययन करतां येत नाही, कीं मोक्षाचे कोणतेच उपाय यथायोग्य रीतीने आचरतां येत नाहीत. त्याला नित्यनैमित्तिक विधीहि करतां येत नाहीत. इतकेंच नव्हे, तर ते आपण आचरावेत अशी वृत्तीच त्याच्या ठिकाणीं राहत नाही. कारण त्या संबंधीयांच्या सुखदुःखांनी त्याच्या मनांत विक्षेप उत्पन्न होतो. इत-केंच काय, पण त्यांच्या दर्शनाने देखील आचारधर्माविषयी अदक्षता ( निर्बळता ) उत्पन्न होते. म्हणून या सगळ्या संबंधीयांचा आचरत्या पुरुषाने त्याग करावा. मनांत त्यांचें स्मरणदेखील करूं नये. धनकोला पाहतांच ऋणको जसा

पळतो किंवा ऋणको धनकोला जसा टाळतो त्याप्रमाणे त्याने आपल्या संबंधी-यांना टाळलें पाहिजे. कोणत्याहि निमित्ताने त्याने त्यांचा संबंध ठेवला तरी त्याला अनिष्ट होऊन त्याच्या धर्माची हानि झाल्यावांचून राहणार नाही. " सारांश, सामाजिक आणि प्रापंचिक जीवन म्हणजे परमार्थांतील अडचण.

पण हें नुसतें तात्त्विक विवेचन झालें. तें मनावर ठसविण्यासाठीं भरपूर उदाहरणें दिलीं आहेत. ' युधिष्ठिर हा वेधवंत होता. परमेश्वराची आज्ञा मोडून आपल्या नातवाला—परीक्षितीला—राज्याभिषेक करण्यासाठीं तो कलियुगांत सात दिवस राहिला. पण त्यामुळेदेखील त्याला स्वर्गाला जातां जातां नरकाचें दर्शन झालेंच. अनिष्ट त्यागी पुरुषांना असें वाटतें कीं, आपण आपल्या मुलाबाळांचा संसार नीट करून देऊं आणि मग अनुसरण करूं. पण त्या संबंधीयांच्या स्नेहामुळे एक तर त्यांना लौकर अनुसरण घडतच नाही, किंवा ते अनुसरलेले असले तर थोर अनिष्ट उपजतें. उदाहरणार्थ, डखले आणि चांगदेवभट हे पेणोवेणा माहूरला श्रीदत्तात्रेयप्रभूच्या दर्शनाला निघाले. रस्त्यांत दाउलवाडी गांवाला डखले यांची एक मुलगी राहत होती. त्या वात्सल्यामुळे एक दिवस ते तिच्या गांवीं राहिले. पण त्यामुळेंच श्रीदत्तात्रेयाच्या दर्शनाला जाऊं शकले नाहींत. तीच गति भूतानंदाचीहि झाली. तिला स्वामींनी कोल्हापूरला पेणोवेणामध्यें न थांबतां जायला सांगितलें. ती निघाली; पण मध्यें नेवाशाला आपल्या मुलीला भेटण्यासाठी थांबली. तेथे मुलीचा हात भाजल्यामुळे आधीं तिच्या शुश्रूषेसाठीं आणि मग तिच्या बाळंतपणासाठीं तिला थांबावें लागलें. म्हणून ती कोल्हापूरला जाऊं शकली नाही. '

' कित्येक सतेवत्यागी पुरुष आपले संबंधीये मेले असले तरी अनुसरणा-नंतर नवीन संबंधीये निर्माण करतात. त्यांच्या स्नेहपाशांत ते अडकतात व पुढें त्यांच्या मृत्यूमुळे आत्यंतिक वियोग झाला म्हणजे त्यांना अनिवार दुःख होतें. उदाहरणार्थ, अहीरदेशांतील एका म्हातारीचे सगळे आप्तेष्ट मरून गेले होते. त्या अनुतापाने ती महाराष्ट्रात गंगातीराला आली. एका ब्राह्मणाच्या ओसरींत राहून भिक्षा मागून काळ कंठूं लागली. पुराण वगैरे ऐकायलाहि ती जात असे. आपल्या मृत लेकरांच्या आठवणीमुळे ती त्या ब्राह्मणाच्या मुलाबाळांनाहि आपल्या ओसरीवर येऊं देत नसे; नव्हे, त्यांच्याकडे

ती पाहातहि नसे. पुढें कांही दिवसांनी त्या मुलांची आई मेली. तेव्हां त्या ब्राह्मणाने ह्या म्हातारीला विनंती केली कीं, 'आई, मी आतां अन्नधान्य मिळवून आणीत जाईन! तूं आम्हांला शिजवून घालीत जा.' तिने तें कबूल केलें. पुढें लौकरच तो ब्राह्मणहि मेला. तेव्हां त्याच्या मुलांचा संभाळ त्या म्हातारीलाच करावा लागला. दळण—कांडण करून, भरडा करून ती त्यांना पोसूं लागली. अशा स्थितींत कुठला तिचा धर्म आणि कुठलें काय? आणि पुढें तर तीं मुलेंहि मेलीं. मग तिच्या दुःखाला सीमा राहिली नाही! याचसाठीं अनुसरलेल्यांनी पुन्हा नवीन संबंध जोडूं नयेत. (दृष्टान्त पाठ ९१)'. (संबंधियाचेनि स्नेहें इतुले मेले नागवले ।।१।। आचारस्थळ).

'कित्येक अनिष्ट व सतेव त्यागीयांचें आपल्या संबंधीयांत इतकें लक्ष असतें कीं, अनुसरल्यानंतरदेखील ते त्यांचें चिंतन करतात. आपल्याप्रमाणे आपले संबंधीयेहि परमेश्वराला अनुसरतील तर मग आपण सगळेच एके ठिकाणीं राहूं आणि एकमेकांच्या उपयोगी पडूं, या भावनेने ते त्या संबंधीयांना मार्गात आणण्यासाठीं म्हणून जातात. पण ते येत नाहीत. कारण त्यांचीं मनें इतरत्र गुंतलेलीं असतात. तीं आपणांबरोबर येत नाहीतसें पाहून त्या अनुसरलेल्या पुरुषांना अत्यंत दुःख होतें. त्यांना पश्चात्तापहि होतो. त्या संबंधीयांना आणण्याचा प्रयत्न करण्यांत लागलेला वेळ परमेश्वरसेवेवांचून व्यर्थ गेला याबद्दल त्यांना तीव्र खेद होतो. उदाहरणार्थ, नागदेवाचार्य परमेश्वरसेवेसाठीं उमाइसाला आणूं गेले होते. पण ती आपल्या इतर स्नेहपाशांत गुंतली होती. वैजोच्या बायकोचें बाळंतपण करण्याची तिला अधिक चिंता होती. त्यामुळे नागदेवाचें म्हणणें तिने ऐकलें नाही. ती आली नाहीं! म्हणून नागदेवाचार्यांना झालेल्या दुःखाला पारावार नव्हता.' पण संबंधीयांसाठीं दुःख करूं नये; कारण 'दुःख म्हणजे पापः दुख तव नरक होतिः' (७१ लीलाचरित्र—पूर्वार्ध १).

'संबंधीयांना प्रत्यक्ष आणायला जाणें तर दूरच राहो, पण त्यांना आणण्याचा मनांतल्या मनांत विचार केला तरी परमेश्वरसेवेला अंतरण्याचा प्रसंग येतो. उदाहरणार्थ, पद्मनाभीदेवाने मनांत असाच विचार केला होता कीं, आपले सगळे संबंधीये अनुसरतील तर आपण येथेच राहून त्यांची सेवा करूं; त्यांच्यासहित परमेश्वरसान्निध्यांत राहूं. त्याचा हा मनोरथ ओळखून श्रीचक्रधरस्वामींनी त्यांचें

जाडीपोतें हिसकावून घेऊन त्याला हाणून दिलें. त्यामुळे तो ईश्वरसान्निधानाला अंतरला '.

पद्मनाभीची ही गोष्ट लीळाचरित्राच्या पूर्वार्धात आहे. पद्मनाभीच्यासंबंधाने चक्रधरांनी धांदुल नांवाच्या एका कुणब्याची गोष्ट सांगितली.— त्याच्या शेतांत ऐरावत चरावयास येई. म्हणून त्याचा जाब विचारण्यासाठीं धांदुल ऐरावताचें शेपूट धरून स्वर्गांत गेला. त्याचें भाग्य उघडलें. पुढच्या वेळीं इतर लोकांस घेऊन तो ' सकुटुंब मोक्षा जावो ' पाहूं लागला; पण वाटेंत वैभवाविषयीं बोलत असतां थोडी कल्पना द्यावी म्हणून त्याने हाताने दाखवण्याचा प्रयत्न केला. साहजिकच तत्काळ ' अवघीचि रिचवली '. तात्पर्य, ' तेया अवघेया यथीची बुधि होए काः सोधुः तेया ही आवडि हो कांः हा दोखुः ' अशी बुद्धि होणें दोषरूप आहे.

सारांश, इतरांची चिंता दूर करण्यासाठीं, निःस्वार्थीपणें किंवा ईश्वराच्या कार्यासाठींदेखील समाजांत राहूं नये. ' अनुसरलेल्या पुरुषाने संबंधीयांचा संबंध विशेष त्याज्य मानावा. त्याने त्यांची झाडपूस ( चौकशी वगैरे ) करूं नये, ममता धरूं नये. नाही तर युधिष्ठिराप्रमाणे अनिष्ट होईल. नवीन संबंधी निर्माण करून तेथे मन गुंतवूं नये; नाही तर अहीरदेशांतील म्हातारीची गत होईल. उत्तम कार्यासाठीं निघालें असतां संबंधीयांची भेटहि घेऊं नये; नाही तर डखले, चांगदेव आणि भूतानंद यांच्यासारखें अनिष्ट जोडेल. उत्तम वस्त्रें वगैरे देण्याच्या निमित्तानेहि संबंधीयांकडे जाऊं नये, कारण त्यामुळे पुढील उत्तम लाभ हातांतून निसटण्याचा संभव असतो. ईश्वराज्ञा नसतांना संबंधीयांना मार्गात आणण्याचाहि प्रयत्न करूं नये; नाही तर नागदेवाचार्याप्रमाणे त्यांच्यावर पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. तसेंच इष्ट क्रिया जोडीत असतांना संबंधीयांची ममता मनांत येऊं देऊं नये. नाहीं तर पद्मनाभीप्रमाणें परमेश्वराला आणि त्याच्या इष्ट क्रियेला अंतरावें लागेल.— तेव्हां संबंधीयांचा संबंध कोणत्याहि निमित्ताने कां होईना, अनुसरलेल्या पुरुषाने ठेवतां कामा नये.

' ...खुंटामुळे व दाव्यामुळे ज्याप्रमाणे गुराला हालतां चालतां येत नाही, त्याप्रमाणे स्त्री आणि संबंधीये यांच्यामुळेहि साधकाला स्वतंत्रपणें आचार करतां येत नाही. त्याचें स्वातंत्र्य नष्ट होतें. म्हणून त्यांचा त्याने त्याग करावा...हें केवळ चेतनसंबंधीयांमुळेच होतें असें नाही, तर जड स्थानांच्या संबंधामुळेहि

होतें. म्हणून त्यांचाहि त्याग करणें आवश्यक आहे... संबंधीयांच्या संबंधामुळे शास्त्राभ्यास आणि विधिनिषेधाचें आचरण योग्य रीतीने होत नाही, इतकेंच नाही, तर त्याज्य म्हणून सांगितलेल्या संबंधीयांचा संबंध ठेवल्याने आज्ञा-भंगाची अयोग्यता लागते; आणि त्यांच्या सान्निध्यांत केलेलें आचरण लेखीं लागत नाही... विकारशून्यत्वासाठीं म्हणजे विकार उत्पन्न होऊं नये म्हणून किंवा विकाराच्या चतुर्विध चालींपैकीं आज्ञासेव्यतिरिक्त इतर उल्लेख निर्माण होऊं नयेत म्हणून स्वदेश, स्वग्राम आणि संबंधीये यांचा त्याग करण्याची जितकी आवश्यकता आहे, तितकीच किंबहुना त्याहूनहि जास्त विषयपदार्थांचा त्याग करण्याची आवश्यकता आहे.' वात्सल्यपाश नाहीसा व्हावा म्हणून आईचाहि त्याग सांगितला आहे. ( जेणेसंबंधे विकारु उपजे तेयाचा असंबंधु कीजे – आचारस्थळ सूत्र १३ ).

समाजाशीं संबंध येईल म्हणून गायनवादनासारख्या गोष्टीच काय ( गीत विखो ॥ १७१ ॥ आचारमालिका ) पण भागवतपुराण कां असेना तें कर्म-रहाटीच्या पुराणिकाकडून सांगितलें जात असतांना सगळ्याच अनुसरलेल्या पुरुषांनी ऐकायला जावें असें मात्र नाही. दुसऱ्याचें बरें करण्यासाठीं आपलें श्रेष्ठत्व प्रकट केल्याने काय होतें हें सांगण्यासाठीं काइदेवाचें उदाहरण दिलेलें असून 'तथापि एकंदरींत हा तोषरोष टाळण्यासाठीं जनसंपर्क टाळावा हेंच उत्तम' हें तात्पर्य काढलेलें आहे. ( आचारस्थळ सूत्र ३० ). साधकाने गांवा-बाहेर निद्रा करणें हाच उत्तम पक्ष ( आचारमालिका ६६ ). पण कित्येक वेळां तें शक्य नसतें. मग नाइलाज म्हणून गांवाजवळ किंवा गांवांत निजावें; आणि लोकांची गडबड चालू असतांना ती कानीं पडलीच तर तिकडे पूर्ण दुर्लक्ष करावें, व मेल्यासारखें पडावें !

गुरूच्या अंगीं कांही दोष असले तरी त्याची सेवा करावी हा मुद्दा मांड-तांना 'नाही तरी बरीं असतांना बायकालेकरांची सेवा तो करीतच होता कीं नाही ? त्यामुळे तो नरकच जोडीत होता', असा एक विचार मांडला आहे. साधकानें कशाचा विचार करावा, हें सांगतांना, 'परमेश्वर, परमेश्वरावतार, परमेश्वरावताराच्या सेवासंबंधाला उपयोगी पडलेला प्रपंच, परमेश्वराचे भक्त, अनुसरलेले ज्ञानिये, बौधवंत व वेधवंत हे सगळे जीव आणि परमेश्वराने ज्यांचा निर्वच केला आहे त्या देवता याव्यतिरिक्त इतर जीव, देवता व प्रपंच हे सर्व

अन्य होत. याची वार्ता करण्यांत, याविषयी उगीच गोष्टी बोलण्यांत व चर्चा करण्यांत अनुसरलेल्या पुरुषांनी आपला वेळ घालवूं नये. परमेश्वराच्या ठिकाणीं त्याची इतकी अनन्यता असावी कीं, कोणत्याहि प्रकारच्या अन्यवार्ता त्याला सलूं लागतील. ह्या अन्य वार्ता करण्यापेक्षा एक वेळ झोपून राहिलें तरी बरें, ' असें स्वच्छ सांगितलेलें आहे. ( नवप्रकरण १५१ ).

ईश्वराच्या परिवारांत प्रामुख्यानें अनुसरलेल्या बोधवंतांचा व ननुसरलेल्यांचा समावेश होतो. अनुसरलेल्या बोधवंतांचे ३१ प्रकार आहेत. यांत समाजाशीं संबंध येणारेः क्र. १७ उपाधिस्थूळ—इतरांना इष्ट घडावें म्हणूनच केवळ उपाधि बाळगणारे, आणि क्र. २४ भजक — पात्रापात्राचा विचार न करतां नेहमीं लोकांना भोजन घालणारे असे दोघेच येतात. 'आपुलेया पडिलेयाची शुश्रूषा कीजे,' असा विधि सांगितला आहे ( नवप्रकरण १६४ ). पण 'आपला' म्हणजे वेधपूर्वक किंवा बोधपूर्वक अनुसरलेला, आणि हें करावयाचें तेंहि ' वचन-रूप परमेश्वराचें ' दास्य करण्यासाठीं. हें सर्व सांगितलें आहे त्यांत वचन-प्रामाण्य किती आहे तें, ' चर्चा करायची ती केवळ ब्रह्मविद्याशास्त्राची आणि तीहि त्या शास्त्रांतील वचनप्रामाण्याच्या दृष्टीनेंच करावी,' या वाक्यावरून कळून चुकेल. ( एथौनि वारिले ते न कीजे की ।। तुम्हा एथौनि भणीतलेः ते करणीये की गा ।। २५३–२५४ ।। नवप्रकरण ).

अशा रीतीने सर्वसंगपरित्याग ही परमेश्वरप्राप्तीच्या मार्गातील पहिली आणि अटळ पायरी आहे. ' परमेश्वराकडे साधकाचें सर्वस्व वेंचलें जाणें अत्यवश्य आहे. तो पूर्णत्वाने परमेश्वराचा होण्यासाठीं परमेश्वराव्यतिरिक्त इतर सर्व जीव-देवता-प्रपंचापासून आधीं मोकळा झाला पाहिजे...परमेश्वराव्यतिरिक्त इतर कशाचीहि आणि कुणाचीहि आशा आपल्या मनांत ठेवतां कामा नये...इत-रांच्याबद्दल दुःख करणें म्हणजे ईश्वराला सोडण्यासारखें आहे. ' हें ओळखून एखादा साधक वागूं लागेल, तो लोकांत जाणार नाहीं, पण लोक त्याच्याजवळ येऊं लागतील. म्हणून जनसंपर्क टाळण्याच्या दृष्टीने, आचरत्या पुरुषांनी मुद्दाम होऊन स्वच्छ आणि नीटनेटकें राहण्याचा प्रयत्न करूं नये ' कारण त्यामुळे आपणाला पाहून इतरांच्या मनांत विकार निर्माण होण्याचा संभव असतो. इत-केंच नाही, तर जाणूनबुजून असें राहण्याचा प्रयत्न करणें हाच मुळांत विकार आहे. लीसपूस करणें हें वेश्येचें काम आहे. साधकाच्या शरीरासंबंधीं स्वामींनी

सांगितलेला हा आचार त्याच्या वेषालाहि लागू पडतो'. (नवे वस्त्रः न नेसावे ॥ ७७ ॥ आचारमालिका ).

चक्रधरांच्या चरित्रांत अर्थातच हीं तत्त्वें दृग्गोचर होतात. एकांकांतील ५० व्या लीलेंत ते एका गांवीं उकिरड्यांत निजल्यामुळे गांवांत काय झालें तें सांगितलेलें आहे. अशा रीतीने जेथे जेथे समाजाचा संबंध येतो त्या त्या गोष्टी निषिद्ध असल्याने उपजीविकेसाठीं केलेल्या व्यापारांबरोबरच, नवसादिक पुण्य-क्रिया, यजन-याजन, दान-प्रतिग्रह, स्नानसंध्या, अघमर्षण, श्राद्धपक्ष, पर्वणी वगैरे विधि व ज्योतिष, वैद्यक आणि इतर अध्ययनअध्यापन या गोष्टीहि निषिद्ध व्हाव्यात यांत नवल कसलें!

पण हें सारें 'समाजसंपर्क नको' असें नकारात्मक वर्णन झालें. 'समाजा-पासून दूर राहिलें पाहिजे,' असें होकारत्मक वर्णनहि कांही कमी नाही. ज्या ठिकाणीं गेलें असतां लोकांना तो जिवंत आहे कीं मेला हें कळणार नाही, अशा ठिकाणीं साधकाने जावें असा आदेश आहे. (आपणेयाते कव्हणी नेणेः आपण कव्हणाते नेणिजे ऐसा स्थानी असावेः आचारस्थळ सूत्र २२ ). जन्म कुठें क्षेपावा ? तर 'देशाचा सेवटाः झाडाचा तळवटा देउळाचा कोनटा' अशा ठिकाणीं (आचारमालिका २१९). नेहमीं 'अटन करावें' म्हणजे भ्रमण करावें. शक्यतोंवर आडगांवींच राहावें. (तुम्ही पुरी पाटणीः न वसावे ॥२०॥ आचारमालिका). अशा परिस्थितींतहि लोकांशीं संबंध आल्यास विहिताचारासाठीं जेवढें बोलणें अगदीं केलेंच पाहिजे तेवढेंच करावें. इतर वेळेला 'दोही ओठां टाळे घालावें (आचारमालिका १९८)' हें होत नसेल तर इतरांचा संग टाळून निघून जावें. 'वायूप्रमाणे आणि अग्नी-प्रमाणे साधकाने निराश्रय आणि निरालंब होऊन असावें,' असें एक ठिकाणीं म्हटलेलें आहे, (पाहा – नीरसाः निराशाः निराश्रया होउनि असावे ॥५३॥ नवप्रकरण), तर फक्त स्मरण करतां येण्याजोगी शक्ति अंगांत ठेवून त्याने प्रेतवत् व्हावें असें दुसऱ्या ठिकाणीं सांगितलेलें आहे. समाजापासून दूर राहायचें तें असें. (जीतेनिः मृताचा धर्मी वर्तावे ॥७४॥ नवप्रकरण).

बरें, अशा तऱ्हेने साधक समाजापासून दूर राहील पण तापत्रयाने पोळणारा समाज दूरवरहि त्याच्यांकडे येण्याचा प्रयत्न करील. यावरहि उपाय आहेतच. 'स्वाभाविक रीतीने लोकांना टाळून ईश्वरध्यानासाठीं आणि आचारासाठीं एकांत

मिळवायचा असेल तर आपलें शरीर तुष्टपुष्ट न ठेवतां तें शुष्क करून सोडावें... (शरीर) अपवित्र करण्यासाठींच त्याने मसणांतील वस्त्र किंवा इतर कुचैलें वापरावीं'. मुंगीच्या पुरुषाचें वर्णन करतांना म्हटलेलें आहे, 'अनुसरलेल्या पुरुषाच्या मनांत पदार्थांची वासना जरी उद्‌भवली तरी त्याच्या शोच्यत्वामुळे, रंकत्वामुळें आणि मलिनत्वामुळे तो पदार्थ कोणाकडूनहि त्याला प्राप्त होऊं नये... पाहणाराला त्याची इतकी किळस यावी कीं, एक वेळ आपल्याजवळचा पदार्थ उकिरड्यावर फेंकून द्यावा, पण याला देऊं नये, असें त्याला वाटलें पाहिजे.' याचें आणखीहि विवेचन अन्यत्र आहेच. त्यांत साधकाने दैन्याभिभूत होऊन राहावें असें सांगितलेलें आहे. 'कुरूपता, निस्तेजता, वेंधळेपणा, मलिनत्व, कुचैलत्व वगैरे हीं मृत असल्यासारख्याचीं लक्षणें होत. साधकाने तीं अंगीं बाणवलीं पाहिजेत.' आपल्यापुढील लोकांस घृणा यावी असें नेसावें, वेड्यासारखें वागावें, केवळ मनुष्यमात्र होऊन असावें, असें स्पष्टीकरणहि पुढें जोडलें आहे. (तुम्हा घृणात्यागु होआवा की गा: लीलाचरित्र उत्तरार्ध ६). पण हें सर्व स्वनिष्ठ क्रियांच्या बाबतींत; परनिष्ठ क्रियांच्या वेळीं साधकाने यशरूप जिणें कंठावें. 'श्रीचक्रधरस्वामीवर हेमाडपंताचे लोक चालून आले त्या वेळीं भटोबास अशा पराक्रमाने लढले कीं, जणुं हा आतां सृष्टिसंहार करतो कीं काय असें वाटलें. हजारों लोकांना हरवण्याचें शौर्य त्यांच्या ठिकाणीं दिसलें. हें यशरूप जिणें होय...पण स्वनिष्ठ क्रियांच्या बाबतीत मात्र अशा रीतीने वागावें कीं, चालतांना आपल्या पायांखालील मुंगी मरूं नये. (मुक्तीची चाड: तेणे मुंगिचे वीरु न चिंतावे ॥ ६५ ॥ नवप्रकरण). इतकें दुबळेंपण त्यानें आपल्या अंगीं बाणवावे.' आतां, वरील शौर्याची आणि या दुबळेपणाची सांगड कशी घालायाची? शौर्य दाखवण्याचे प्रसंग कधींमधीं येणारे असतात. नेहमींचा आचार 'अंगीं दुबळेपणा बाणवावा' असेंच सांगतो. (हाडांची रांगवळी करावी नायका ॥ ७७ ॥ कटंकटियेमान होउन असावें ॥ ७८ ॥ नवप्रकरण). तेव्हां हा विरोध आहे. जीव शरीरांतून जाणार नाही एवढीच काळजी घेऊन शरीर सुकवावें, हा ज्यांचा आदर्श ते यशरूप जिणें कसें जगणार?

समाजापासून अलिप्तता मिळावी म्हणून कसें वागावें एवढेंच सांगून हें तत्त्वज्ञान थांबत नाही, तर 'लोकांच्या उपयोगी पडूं नये' असें सांगतें. महानुभावांचें ब्रह्माचें वर्णन पाहण्याजोगें आहे. 'ब्रह्माच्या ठिकाणीं स्वरूपांच धर्म

असले तरी शक्तिरूप धर्म नाहीत. शक्तिरूप धर्म इतरांना दिले जाऊं शकतात आणि पुन्हा परतहि घेतले जाऊं शकतात. असे दिले-घेतले जाणारे धर्म, इतरांच्या उपयोगाकरितां कामीं पडण्याजोगे धर्म ब्रह्मस्वरूपीं नाहीत. उदाहरणार्थ, ब्रह्मस्वरूप स्वतः नित्यमुक्त असलें तरी नित्यमुक्तत्वाचा शक्तिरूप धर्म त्याच्या ठिकाणीं नसल्यामुळे तें जीवाला ' कैवल्य ' करूं शकत नाही. तेव्हां ब्रह्मस्वरूप सर्वधर्मशून्य आहे याचा स्पष्ट अर्थ असा कीं, शक्तिरूप असे कोणतेहि धर्म ब्रह्मस्वरूपीं नाहीत. त्यामुळे एखाद्या बाह्यशक्तिहीन शेजाऱ्या-प्रमाणे ब्रह्मस्वरूप हें आपल्या शेजारीं असलेल्या ईश्वराच्या किंवा मायेच्या कोणत्याहि प्रकारें उपयोगी पडूं शकत नाही...शक्तिरूप धर्माप्रमाणे शक्तिरूप गुणदेखील ब्रह्मस्वरूपांत नाहीत. म्हणूनच त्याला ' निर्गुण ' असें म्हणतात. ब्रह्म-स्वरूप निर्गुण असल्यामुळे कोणत्याहि प्रकारचें कार्य तें स्वतः कधींच करत नाही... तें मायेपेक्षां वडील आहेच, पण ईश्वरस्वरूपाला निर्गुणत्वाने मान्य असल्यामुळे त्यालाहि तें वडील आहे. ' ( म. त. प्र. ५ ).

लोकांच्या उपयोगी पडूं नये असें सांगण्यांत महानुभावांनी आपल्या डोळ्यांसमोर आपल्या या ब्रह्माचाच आदर्श ठेवला आहे असें वाटतें ! वर एके ठिकाणीं वर्णन केल्याप्रमाणे ' इंद्रियासी आहारु न द्यावा : प्राणासी आहारु द्यावा ' ( नवप्रकरण ९७ ) व शरीर सुकवावें हा ज्यांचा आदर्श ते लोकांच्या काय उपयोगी पडणार ! पण याची त्याना खंत नाही. कारण लोकांच्या उप-योगी पडूं नये असेंच त्यांचें शास्त्र सांगतें. ज्यांच्या उपयोगी पडावें त्यांच्या क्रियांचे लेप लागतात, प्रत्येक क्रिया संतासंतमिश्र असते ( क्रिया उभयरूपा : विचार २०६ ). हें सर्व पुढें फेडावें लागतें. कारण पाप व पुण्य या दोन्हीचाहि क्षय होईल, तेव्हांच मुक्ति मिळावयाची आशा ! म्हणून ' अप्रिय बोलूं नये, प्रिय बोलावें ' अशीं वचनें आहेत, पण महानुभावांव्यतिरिक्त इतर पुरुषांशीं, उपयोगी न पडतां, प्रिय बोलत असावें, असें सांगितलेलें आहे. मुलांना जन्म देऊन पितृऋण फेडावें, समाजाच्या उपयोगी पडावें, असें म्हटलें तर महानु-भावांच्या मतें एकदां स्त्रीशीं संबंध केल्यानंतर बाकीचे संबंध उष्टे होतात व अर्थातच ते गर्ह्य बनतात. ( यंत्रारूढा होइजे : तो उसीटा विखो भोगणे की : १९४ विचार ). आचरल्या पुरुषांच्या दृष्टीने तर स्त्रीसंबंध हें पापच होय. एखाद्या प्रसंगाकडे कौतुकाने पाहून कोणास उत्तेजन देऊन उपयोगी पडावें

म्हटलें तर तसें पाहणें हा तर फार मोठा विकार मानला आहे. कोणी जर असें म्हणेल कीं, आपण लोकांचा उद्धार करूं, तर तें शक्य नाही. कारण, ' कृपाशक्ति मिळाल्यास आपण आतां ईश्वर बनलों असें जीवास वाटेल, आपणाला अशक्य अशा जीवोद्धरण कार्याकडे तो वाहवेल आणि त्यामुळे साध्यानंदाला तो अंतरेल. म्हणूनच जीवाच्या कणवेमुळे परमेश्वर त्याला कृपाशक्ति देत नाहीत. ( दयाः मयाः कृपाः करुणाः हे ईश्वरीचि आति ।। १२१।। विचार ). त्यामुळें परमेश्वराकडे वंचकपणाचा दोष येत नाही, ' असें याविषयीं म्हटलेलें आहे.

परमेश्वरप्राप्तीचे मार्ग दोनः ज्ञानमार्ग व प्रेममार्ग. ' ज्ञानापसि प्रेम उत्तम ' हें वचन पूर्वी उद्धृत केलेंच आहे. या वचनास अनुसरून ज्ञानियांना प्रेमाचे अनेक उपाय सांगितलेले आहेत. शुश्रूषा करणें, सेवादास्य करणें वगैरे उपाय त्यांत आहेत; पण ते फक्त ज्ञानियांच्यासंबंधानेच होत. पंथांत येऊं घातलेल्यांना किंवा नुकत्याच आलेल्यांना काय, तें स्पष्ट नाहीं. शास्त्र सांगणें वगैरेहि उपाय त्यांत आहेत; पण ते पंथाबाहेरच्या लोकांसाठीं नाहीत हें उघड आहे. 'दुष्काळीं भजन घालणें' तें कोणासाठीं हें स्पष्ट नाही; संदर्भ ज्ञानियांचा व आर्तांचा आहे. 'देवतांना शरण जाऊं नये' या मुद्द्याखाली ' वैद्यकीचें किंवा ज्योतिषादिकाचें ज्ञान वापरून स्वसंरक्षण करूं नये,' असें म्हणून पुढें ' आपल्या संबंधीयासाठीं जो साधक असे उपद्रव सहन करतो तो तर नरकाचेंच साधन जोडतो,' असें म्हटलेलें आहे.

अशा रीतीने, लोकांच्या उपयोगी पडूं नये, इतकेंच नव्हे, तर परोपकार न करण्याविषयी महानुभावांचा आग्रह आहे. ' मसणाच्या लांकडाहून हीन जिणें' या मुद्द्याखालीं म्हटलें आहे, 'परमेश्वराकडे सर्वस्व अर्पण करतां येण्यासाठीं साधकाने आपलें आयुष्य लौकिकाच्या दृष्टीने अत्यंत हीनपणें, शोच्यपणें कंठलें पाहिजे...'त्याने प्रेतवत् असावें हें आपण मागे पाहिलें. ' एका दृष्टीने त्याने मसणांतील लांकडांपेक्षांहि हीन जिणें जगलें पाहिजे असें म्हणतां येईल. मसणांतील लांकूड हें प्रेतासारखेंच बाटलेलें असतें. कुणी त्याला स्पर्शसुद्धां करीत नाही. पण तेंहि अघोरपंथीयांना, अभिचारकांना, म्हणजे कूड मांत्रिकांना उपयोगी पडतें. परमेश्वरसाधकाने लोकांच्या तितकेंहि उपयोगी पडूं नये. उदाहरणार्थ, अनुसरलेला पुरुष आपला आचार करीत असतांना त्याला कोणीं रस्ता विचारला तर तोहि त्याने सांगूं नये. तिकडे त्याचें

लक्षच असतां कामा नये. कारण रस्ता विचारणारा गृहस्थ आपण सांगितलेल्या रस्त्याने जाऊन एखाद्या माणसाची हिंसा जर करील तर, किंवा त्या रस्त्यांत सर्पव्याघ्रादिकांनी तो मारला गेला तर, त्या हिंसेला निमित्तकारण तो साधकच होणार...याचसाठीं त्याने दुसऱ्याच्या भानगडींत सहेतूनेहि पडूं नये, हें चांगलें.' या नियमाने एखाद्या चांगल्या गोष्टींत अडथळा येण्याचीहि तितकीच शक्यता नाहीं काय ? पण महानुभावांना चांगलेंसुद्धां करायला नको आहे कारण 'सृष्टीमध्यें जेतुलेही जीवु करी : तेतुलेनि काइसेनिहीं मुंचेनाः एकवाचौनि;' ॥२६७॥( विचार. ).' आग्रह ' हा शब्द जो या परिच्छेदाच्या प्रारंभीं वापरला आहे, त्याचें प्रयोजन पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईल :

'अनुसरलेल्या पुरुषानें आपण जिवंत असतांना इतरांच्या उपयोगी पडूं नये; इतकेंच नाही, तर मेल्यानंतरहि कुणाच्या उपयोगी पडूं नये. मेल्यानंतर आपल्या देहाला किडामुंगी लागली तर त्यांना तो खायला मिळेल. हेंहि उपयोगी पडणेंच होय. त्यामुळे त्यांच्या देहाभिमानी देवतांचें संत अर्जिलें जाईल व तीं संतकर्में पुढे अपरोक्ष ज्ञानांत क्षाळावीं लागतील. ' प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरम् ' या न्यायाने अनुसरलेल्या पुरुषाने आधींच आपला देह इतका सुकवून ठेवावा कीं, किडामुंगीलासुद्धां त्यावर मांस सांपडूं नये. इतकें करणें अवश्य आहे. ' ( मसनीचे लाकूड तेहि वरि उपयोगा जाए: परि आपण कवणाचे उपयोगा न वचावे ॥ ५९ ॥ नवप्रकरण ).

हें विवेचन वाचल्यानंतर, कांही विद्वानांच्या मताप्रमाणे, ' महानुभाव महंत समाजाला भिऊन लांब राहिले ' असें म्हणण्यापेक्षा, ' त्यांच्या तत्त्वज्ञानानेच त्यांना दूर राहणें भाग पाडलें ' हें म्हणणें सयुक्तिक आहे हें सहज दिसून येत नाही काय ? दुसऱ्या कांहीं विद्वानांच्या मतें, महानुभावांनीं संन्याशांची संघटना केली. याहि मताचा पुढीलप्रमाणे विचार केला असतां 'महानुभाव व्यक्तिनिष्ठ होते ' हाच विचार स्पष्ट होईल, असें वाटतें.

एकांतावर महानुभावांची फार प्रीति होती. त्याचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे केलेलें आहे : ' जीव अज्ञान व मतित्रयानें युक्त असल्यामुळें त्याच्या हातून कोणत्या वेळीं कोणतें दुष्कर्म घडेल कांही सांगतां येत नाहीं. म्हणूनच अनुसरलेल्या जीवानें लौकिक दृष्टया कर्मरहाटीच्या जीवांच्या संबंधांत येऊंच नये. याचसाठीं तर श्रीचक्रधरस्वामींनी साधकाला सर्वसंगपरित्याग करून अटनविजन करीत देशाच्या

शेवटीं जाऊन कांटेरी झाडाखालीं परमेश्वरस्मरण करायला सांगितलें आहे. '

एकांताप्रमाणेच एकलेपणावरहि महानुभावांचा भर आहे. भ्रमंती करावयाची ती एकट्याने. कारण, ' बहुतांचा मेळी । एकमेकेंसी उपजे कळि । दोघा असता जवळी । गोष्टी घडे ' ( उद्धवगीता ). याच काव्यांत पुढें म्हटलेलें आहे; ' दुजेयाचा संगी । पडे स्नेहाची वज्रांगी । गोष्टी मातु करी वाउगी । वेळु फेडावया । ...म्हणौनि एकाकिता निःसंगी । साधावी वीतरागी । ' जो साधक एकटाच अटन-विजन करतो तो असती परी उत्तम रीतीने आचरून विजयी होऊं शकतो. चक्रधर ' हे एकाकी असेल ' असा आग्रह अनेकवार धरीत ( लीळाचरित्र: पूर्वार्ध १०७–११३ ) व कोणीं जाऊं न दिल्यास भांडून किंवा रुसून जात. ( एकांक ५२ ). ' एकला विजया ' असें श्रीचक्रधरस्वामींनी म्हटलें आहे ( आचारमालिका १३१ ). ' त्यामुळे इतर जीवांचें आलंबन सुटून विकारविकल्पादि दोष चुकावे हाच मुख्य हेतु असतो '. याला अपवाद म्हणजे ज्यांना हें शक्य नाही ते आणि स्त्रिया ह्यांचा; अर्थातच हा कनिष्ठ मार्ग होय. एकटेपणाने नित्य अटन करणें हाच श्रेष्ठ मार्ग. ' हा एकलेपणाचा कंटाळा मधूनमधून कां होईना, पण झाडून टाकणें अवश्य ठरतें. त्यासाठीं साधकाने प्रसंगोपात्त ज्ञातविरक्त पुरुषांचा संग जोडणें निषिद्ध ठरत नाही ', त्यांतहि ' सहज भेट उत्तम ', शक्यतोंवर मुद्दामहोऊन नको.

' संग ' म्हणजे आपण दुसऱ्याजवळ राहणें आणि ' सांघात ' म्हणजे दुसऱ्याला आपल्याजवळ ठेवणें. साधकाने एखाद्या उत्तम चर्यावंताचा किंवा अधिकरणाचा ' संग ' करायचा असतो तो त्याच्यापासून वैराग्याचे धडे शिकण्यासाठीं, आणि एखाद्या अधिकरणानें साधकाला ' सांघात ' द्यायचा असतो तो त्याला शास्त्र घोकवण्यासाठीं ( उजळलेयाचि संगे । मैळला उजळे ॥२०३॥ नवप्रकरण ). पण संघ, सांघात यांचा भेट व शुश्रूषा या गोष्टींबरोबर निमित्तविधींत समावेश होतो; नित्य विधि अटन-विजन, भिक्षाभोजन स्मरणप्रसादसेवा आणि निद्रा हेच आहेत. बरें, असा निमित्तविधी म्हणून भेट झाल्यानंतरहि ' त्यांनी फार तर पांचसात (१२) दिवस एकत्र राहावें. तदनंतर आपापल्या मार्गाने निघून जावें. ( नवप्रकरण १३४ ). ( एकमेकांना सोडून जावेंसें वाटणार नाही असें ) प्रेम किंवा द्वेष निर्माण होत आहे असें दिसून आल्यास दोघांनीहि परस्परांचा एकदम त्याग करून निघून जावें.. पर-

स्परांच्य भक्तिज्ञानवैराग्यादि गुणांची आवड असेपर्यंत एकत्रित राहावें.' अच्युतगोत्रीयांची परस्परांवर प्रीति पाहिजे, असें चक्रधर म्हणतात. पण 'कित्ये-कांना तर भेटीचा पहिलाहि क्षण दुर्लभ वाटत नाही. त्यांनी एकमेकांच्या सह-वासांत यत्किंचित् राहूं नये. ताबडतोब विभाग करून निघून जावें. नाहीतर अर्थातच अनिष्ट उपजेल.' हा संग करावयाचा तोहि विधिपालन म्हणून. 'त्या संगासाठीं—विधिपालनासाठीं—फार झालें तर भिक्षूची एक वेळ प्रार्थना करावी. पण त्याजवर नेहमीं अवलंबून राहूं नये. एक वेळ प्रार्थना करावयाची तीहि विधिभंगाचा दोष टाळण्यासाठीं'. बाकी सर्व परमेश्वरासाठीं. कारण सर्व त्याचेंच मानावें.

'झोळीहि परमेश्वराचीच मानावी.' हा परिच्छेद वाचल्यानंतर महानु-भावांना संन्याशांचाहि समाज, समुदाय नको होता ही गोष्ट उघड होते. ज्याला कोणतीहि आशा राहिलेली नाही त्याला समाजाची भीति बाळगण्याचें व म्हणून त्याच्यापासून दूर राहण्याचें काय कारण आहे ? समाजानें जास्तींत जास्त काय केलें असतें ? मारलें असतें. पण या बाबतींत 'मारिता पूजिता समान होआवा की' एवढेंच सांगून चक्रधर थांबत नाहीत तर 'मारणाऱ्यापुढें आपलें डोकें करावें' असेंहि सांगतात. ( नवप्रकरण ६३, ६४ ). त्यांच्यावर सैनिक चालून आले असतां 'हे मुनीच आले आहेत कीं', असे उद्गार त्या पुरुषश्रेष्ठाने काढले.

तेव्हां समाजाला भिऊन महानुभाव दूर राहिले, असें वाटत नाही. त्यांना कोणत्याहि स्वरूपाचा समाज नकोच होता. त्यांना संन्याशांचीहि संघटना करा-वयाची नव्हती. संन्याशांची संघटना करून त्यांना काय मिळवायचें होतें ? मोक्षपदावर तर स्वारी करायची नव्हती ! तेव्हां महानुभाव समाजनिष्ठ नव्हते तर व्यक्तिनिष्ठच होते असें दिसून येईल. 'महानुभाव आचारधर्म' या ग्रंथां-तील एका प्रकरणाचें शीर्षक 'संग : सांघात' असें असल्यामुळें 'महानुभावांना संन्याशांची संघटना करावयाची होती' असें वरवर पाहून वाटतें हें खरें; पण त्याचा तपशील पाहून महानुभाव नुसते व्यक्तिनिष्ठ नव्हते तर अतिरिक्त, विल-क्षण व्यक्तिनिष्ठ होते असेंच कोणीहि म्हणेल आणि ही व्यक्तिनिष्ठा महानुभाव तत्त्वज्ञानांत कशी सर्वांगीण आहे तेंहि —पूर्वी सुचविल्याप्रमाणे—कळून येईल.

यावर कोणी विचारील, "श्रीचक्रधरांचा अवतार सर्वश्रेष्ठ होता कारण त्यांना जीवोद्धरणाचेंच काय तें व्यसन होतें; आणि त्यासाठीं ते लोक आपल्या-

कडे येण्याची वाट न पाहतां लोकांकडे जात होतेच की नाही ? त्याचप्रमाणें आपल्या शिष्यांत खोटीं भांडणें लावणें, त्यांना द्वंद्वें करावयास सांगणें आणि इतर खेळ करून घेणें वगैरे गमतीच्या गोष्टी ते करीत; त्यावरून त्यांना लोकांनी एकत्र यावें, लोकांचा सहवास असावा असें वाटत असल्याचें दिसत नाही काय ? आणखी असें कीं, पुनः पुन्हा घेतल्या जाणाऱ्या भोगास त्यांनी उष्टें म्हटलें असेल, पण योग्य विशिष्ट तऱ्हेने ठेवलेला संबंध पापरूप नव्हे, असें सांगून त्यांनी प्रापंचिकांना संसार करण्यास पाठिंबाच दिलेला आहे, असें म्हटलें पाहिजे. ''

यांतील पहिल्या मुद्द्याचें उत्तर असें कीं, ही जीवोद्धाराची कामगिरी फक्त परमेश्वर किंवा त्याचा अवतार करूं शकतो. 'पात्रापात्रता किंवा योग्यायोग्यता न पाहतां, कृतकर्माकडे लक्ष न देतां, लहानमोठा न म्हणतां, प्रत्युपकाराची अपेक्षा न करतां एखादी वस्तु कायमची देऊन टाकणें, तिच्यावरील आपला हक्क काढून घेऊन ती सर्वस्वीं दुसऱ्याला देणें, याला दान किंवा औदार्य असें म्हणतात. हा औदार्याचा गुण फक्त परमेश्वराच्या ठिकाणीं आढळतो, जीवदेवतांच्या ठिकाणीं आढळत नाहीं. या गुणाप्रमाणेच दया, मया, कृपा आणि करुणा हेहि गुण फक्त ईश्वराच्याच स्वरूपीं आहेत.' चक्रधर स्वतःस परमेश्वराचा अवतार म्हणवीत असत, त्यामुळे त्यांच्या अंगीं जीवोद्धार करण्याचें सामर्थ्य होतें. जीवांच्या ठिकाणीं तें नसतें याचा उल्लेख मागेहि एकदां आला आहेच. जीवोद्धार करण्यासाठीं लोकांत मिसळायचें तें परमेश्वराने किंवा त्याच्या अवताराने; दुसऱ्या कोणीहि नव्हे. 'परमेश्वराच्या दानाला पात्र होण्याला जीवाने थोडी तरी क्रिया जोडलेली असली पाहिजेच,' ही अट वाचली व परमेश्वरप्राप्तीसाठीं सर्वसंगपरित्याग आवश्यक आहे ही गोष्ट लक्षांत आणली म्हणजे महानुभाव तत्त्वज्ञानाचा कांटा समाजनिष्ठेपेक्षा व्यक्तिनिष्ठेकडेच झुकत असल्याचें मान्य करावें लागेल.

'कर्माप्रमाणेच अनुसरतांना ज्ञानियाने द्वादश धर्माचाहि त्याग करणें अवश्य आहे.' ते द्वादश धर्म पुढीलप्रमाणेः—(१) देशधर्म, (२) ग्रामधर्म, (३) जातिधर्म, (४) कुळधर्म, (५) वर्णधर्म, (६) आश्रमधर्म, (७) पुराणधर्म, (८) आगम धर्म, (९) प्रवृत्तिधर्म, (१०) निवृत्तिधर्म, (११) युगधर्म, (१२) राज्यधर्म यांशिवाय विधिविषयांचाहि त्याग आवश्यक आहे. ( पहा—कर्मः धर्मः विधिः विखोः परित्यजोनि परमेश्वरा शरण रिगावे. ॥ ५६ ॥ नवप्रकरण ). त्यांचा

उल्लेख मागे केलाच आहे. म्हणजे परमेश्वरावतार लोकांकडे जातो तें त्यांना ह्या गोष्टी करण्यास सांगण्यासाठीं! 'आईला आपल्या मुलाविषयीं जसें ममत्व वाटतें तसेंच परमेश्वराला सर्व जीवांविषयी वाटतें. जीवाला पाहतांच तें ममत्व उचंबळून येतें. ' आई मुलाला पाहतांच काय करील ? तर लगेच त्याला जास्तींत जास्त आनंद देईल. पण परमेश्वर काय करतो ? ' म्हणूनच त्याच्या उद्धारासाठीं परमेश्वर सृष्टिरचना करतो, स्वतः अवतार धारण करतो आणि त्याला ज्ञान किंवा प्रेम देऊन तो उद्धरणाच्या मार्गाला लागेल असे योगायोग घडवून आणतो. ' या ज्ञान व प्रेममार्गाचा निरनिराळ्या संदर्भांत वर विचार केला आहेच. पहिल्या मुद्द्याचा विचार येथे पुरा होईल. दुसऱ्याचें उत्तर असें कीं, चक्रधर स्वतः खेळ खेळण्यास सांगत असल्याने खेळ खेळणाऱ्या जीवांची कर्मे नाश पावत असत. खेळामध्यें परमेश्वराची आज्ञा ही खेळापेक्षा महत्त्वाची असे. तेव्हां चक्रधरांनी समाजाशीं संबंध यावा म्हणून खेळ खेळण्यास सांगितलें असें नाही. चक्रधरांच्या आज्ञेवांचून खेळ खेळणाऱ्यांचीं कर्मे नाश पावणार नाहीत, ही गोष्ट अर्थातच उघड आहे.

तिसऱ्याचें उत्तर असें कीं, संसार करण्यास अशा रीतीने सवलत दिली असली (पहा—गोसावी ग्रहस्थधर्म नीरूपीले—लीलाचरित्र भाग ४ पूर्वार्ध खंड ३) तरी ती सर्वांना नव्हे. एवढेंच नव्हे, तर वरील विवेचन लक्षांत ठेवणाऱ्यास हें कळून चुकेल कीं, संसारांत गुरफटण्यापेक्षा संसार सोडण्यावरच महानुभाव तत्त्वज्ञानाचा सर्व भर आहे. सवलत म्हणजे आज्ञा किंवा पुरस्कार नव्हे. आदर्श आहे तो सर्वसंगपरित्याग करणाऱ्यांचाच. या त्यागांत इतर नाना गोष्टींप्रमाणेच बऱ्यावाईट सर्व मानवी भावना येतात हें आपण मागे पाहिलेंच.

या विवेचनावरून महानुभावांचें तत्त्वज्ञान पूर्णपणें व्यक्तिनिष्ठ आहे, हा मुद्दा सिद्ध होईल असें वाटतें. ही व्यक्तिनिष्ठा त्यांच्या तत्त्वज्ञानांत कां आली आणि ती महाराष्ट्राच्या मनोवृत्तीशीं विसंगत कशी आहे असे प्रश्न हा लेख वाचून होतांच मनापुढें येतात. या प्रश्नांचें उत्तर एक स्वतंत्र लेख लिहून देण्याचें योजिलें आहे. तो लेख वाचल्यानंतर महानुभावांचें तत्त्वज्ञान अपरिहार्यपणेंच व्यक्तिनिष्ठ आहे हें स्पष्ट होईल आणि महानुभावांच्या पराभवास ते स्वतःच कारण झालेले आहेत हेंहि दिसून येईल.






# — १ —

# महानुभाव

## ( उत्तरार्ध )

# महानुभावांची व्यक्तिनिष्ठा

## आणि

# समाजनिष्ठ महाराष्ट्र

महानुभावांच्या तत्त्वज्ञानांत अक्षरशः जगावेगळी व्यक्तिनिष्ठा कां आली असावी या प्रश्नाचा विचार या लेखांत प्रथम करावयाचा आहे. या प्रश्नाचें उत्तर फक्त एका शब्दांत देतां येतें. तें म्हणजे 'द्वैत'. महानुभाव पक्के द्वैती आहेत. 'जीव, देवता, प्रपंच व परमेश्वर ह्या चार भिन्न आणि नित्य वस्तू होत. या चारहि वस्तूंमध्ये पूर्णपणें भेद आहे; द्वैत आहे. त्यांपैकीं कोणत्याहि दोन किंवा अधिक वस्तूंचें ऐक्य कोणत्याहि स्थितींत केव्हांहि होणें शक्य नाही.' (म.त.प्र. १). जीवेश्वरसंबंधाच्या दृष्टीनें महानुभाव तत्त्वज्ञान हें द्वैताचें तत्त्वज्ञान असल्याचें दिसून येतें. (पहा—जीव जीवा साजात्यः हें सकळांही वैजात्य ॥१२७॥ विचार).'जीवेश्वरा स्वामीभृत्यसंबंधु हा अनादीचा,' (१२४ वि.) म्हणून नित्यहि आहे. महानुभाव पंडितांनी अद्वैताचें खंडन करून द्वैतमत पुढें मांडलें आहे. जीवस्वरूपाचें विवेचन पुढीलप्रमाणे केलेलें आहे : "जीव अनेक आहेत. अनादि आणि नित्य अशी ही जीव वस्तु 'एकु' असली (म.वा.२) तरी ती फक्त जातित्वाने. म्हणजे देवता-वर्ग ही ज्या अर्थाने 'एक' वस्तु आहे, त्याच अर्थाने जीव-वर्ग ही 'एक' वस्तु आहे. पण वस्तुतः अनादि आणि नित्य असे जीव 'अनेक' आहेत." (पहा— तरी एकु का म्हणितलेः ना हे एकवचनी बहुवपर्णः जीवाची रासि एक म्हणौनि एकु म्हणितले । जैसे मिरी, पोफळ, आलें, म्हणितलेया काइ एक

मिरी, पोफळ, आलें होए नाः हे एकवचनी बहुवपणः म्हणौनि एकु आति म्हणितले—म. वा. प्र.) ' अनंते ब्रह्मांडेः अनंता देवताः अनंत जीवुः अनंत परमेश्वरः' (वि. २१२) या सूत्रांत गणनेच्या दृष्टीनेच जीवांचें अनंतत्व म्हणजे अनेकत्व सांगितलेलें आहे.

या जीवांचें आणखीहि पुढीलप्रमाणे केलेलें वर्णन आढळतें: "अशा असंख्य जीवांचीं स्वरूपें आपापल्या मर्यादेने मूळ सृष्टीपूर्वी तमोविभागांत सुखदुःखरहित स्थितींत पडलेलीं होतीं; त्यांत तीं हरपून गेलेलीं होतीं. विशाल समुद्रांत ज्याप्रमाणें असंख्य जलचर प्राणी निमग्न झालेले असतात तद्वत् अनंत ब्रह्मांडीं घातले जाणारे जीव तमोमायेच्या स्वरूपांत हरपून गेलेले होते. अर्थात् आपापल्या स्वरूपमर्यादेने ते त्या ठिकाणीं असतांना एकमेकांना व्यापून नव्हते, तर एकमेकांपासून दूर होते हें लक्षांत ठेवलें पाहिजे. जीवाचें स्वरूप स्थूल मानाने या प्रकारचें आहे." (म. त. प्र. २ ). हें वर्णन वाचून जीव अनंत होते व त्यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नव्हता, हा मुद्दा स्पष्ट होतो. अद्वैत तत्त्वज्ञानामध्ये सर्व जीव हे ब्रह्माचेच अंश असल्याने त्यांचें एकमेकांशीं अत्यंत दृढ नातें असतें. तें अर्थातच महानुभावांना संमत नाही. अद्वैत तत्त्वज्ञानी स्वतःस ब्रह्म म्हणतो आणि दुसऱ्यास ' तूंहि तेंच आहेस ' असें म्हणतो. महानुभावी स्वतःस एक जीव म्हणतो व दुसऱ्यास दुसरा एक जीव म्हणतो; दोघांत एकत्व असण्याचें कांही कारण नाही. अद्वैत तत्त्वज्ञान्याला साहजिकच इतरांशीं आत्मभावनेने वागावें हें सांगण्याचें कारण पडत नाहीं.

मग महानुभावांनी एकमेकांशीं कसें वागावें ? तर त्यांनी "इतरांना अभय द्यावें. सर्व प्राणिमात्रांची शारीरिक, मानसिक व वाचिक हिंसा चुकवावी. ( बाइ प्राणियांचेया इष्टा आड न एइजे को ।। २३४ ।। हिंसा वर्ते तिये स्थानीं महात्मेया असो नये ।। २४० ।। हे करी तेया नरकुः धरी तेया नरकुः एक एका दे तया नरकु ।। २४१ ।। एथींची सेवाः ते भूता अविरोधे करावी की गा ।। २४३ ।। नवप्रकरण—चक्रधरोक्त सूत्रपाठ)—यासाठीं त्याने जीवमात्राच्या ठिकाणीं सर्वात्मक ईश्वर व्यापलेला आहे हें मनांत आणावें. आपण कोणालाहि दुखवलें तर त्यामुळे जणूं कांही परमेश्वरच दुखावला जातो असें मानावें." (म. आ. प्र. ७ ). या ठिकाणचे ' मनांत आणावें ' व ' मानावें ' हे शब्द मनांत आणले म्हणजे ताबडतोब कळतें कीं, अहिंसा-

धर्माची महति सांगण्यासाठीं 'अशी कल्पना करा' असें सांगणें महानुभावांना भाग पडलें आहे. महानुभाव दुसऱ्यांचें कांहींहि लागत नाहीत. प्रत्येकाने आपल्या संतासंत कर्मांचा क्षय करावा, असें त्यांचें म्हणणें. हें केलें म्हणजे झालें. दुसऱ्या जीवासाठीं कांही करायला गेलें कीं 'प्रत्येक क्रिया संतासंतमिश्र असते' या न्यायाने क्रियाकर्में आणि त्यांचे विकटणारे गुण वाढत चाललेच, व मोक्ष दुरावलाच. तेव्हां दुसऱ्यासाठीं कांहींहि न करणें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य होय.

हें झालें स्वतः दुसऱ्यांविषयी काय करावें याविषयी. दुसरा कोणी त्रास देऊं लागल्यास काय करावें ? "इतरांनीं दिलेलें दुःख सोसावें हा सर्वश्रेष्ठ आचार. आपला अपराध असो, नसो, पण प्रतिकूल पुरुषांनी दिलेलें शारीरिक व मानसिक दुःख सहन करणें, त्यासाठीं आपलें शरीर पुढें करणें," हा महानुभावांचा आचारधर्म होय. ( म. आ. प्र. ७ ) कारण जितके अधिक कष्ट सोसावे तितका अधिक कर्मनाश होतो. यासाठींच आत्मघात करूं नये; एवढेंच नव्हे, तर आत्मघात लांबवावा आणि जास्तींत जास्त वेदना सहन कराव्या, 'आया बापो' न उच्चारतां सोसाव्या, असें त्यांचें शास्त्र सांगतें. ( आत्मघातकियासि कव्हणी ठावो नाही नाएका ॥ ६९ ॥ विचार ).

इतके कष्ट करणें जिवाला अपरिहार्य आहे; कारण अविद्याबंधाचें दृढत्वच तसें असतें. 'जीवस्वरूपींची अविद्या वज्रकीटकीप्रमाणे आहे. तिचा नाश करण्यासाठीं जीव अनेक उपाय करतो; पण त्यामुळे त्याच्याकडून अधिकाधिक प्रमाणांत नरकच जोडले जातात. परमेश्वर आपल्या कृपादृष्टीच्या अणीने जेव्हां तिचा छेद करतील तेव्हांच तिचा नाश होऊं शकतो; एरवीं नाही. जीवस्वरूपाला लागून असलेला अविद्येचा बंध इतका घनिष्ट असतो.' असें अन्यत्र म्हटलें आहे.

या उलट जर कोणी आनंदासाठीं विषयसुखाच्या मागे लागेल तर 'पुरुषु जेतुल जेतुली विषयसेवा करी तेतुल तेतुला धर्मी निबळ जाय' असा स्पष्ट इषारा दिला आहे. 'जडपदार्थांच्या निरंतर सेवनाने जर इतकी अदक्षता येते तर चेतनपदार्थांच्या म्हणजे स्त्रीच्या उपभोगाने व सेवनाने किती येत असेल, याची कल्पनाच करावी ! ( यांत कोठें अनैतिकतेचा उल्लेख नाही. तरी पण... ) त्याने ( म्ह. अनुसरलेल्याने ) उपरति करून अधिकवृत्तीचें

आचरण केलें तर देहविद्या, समानवृत्तीचें आचरण केलें तर देवतादि फळें होतात-हें खरें; पण या सृष्टींत त्याला मोक्ष मात्र मुळींच मिळूं शकत नाहीं. त्या दृष्टीने तो कायमचा दुबळा झाला म्हणायचा.' आणि मनुष्यहिंसा केली तर 'ज्याने हिंसा केली त्याला व ज्याची हिंसा केली त्याला अशा दोघांनाहि ...तेरा नरक भोगावे लागतात.' दुसऱ्याचें अंतःकरण दुखवल्यानेहि हिंसा घडते, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. (म. त. प्र. ९). (चहुं युगीं हिंसा अधर्मु ॥ ४४ ॥ विचारमालिका).

अशा रीतीने महानुभावांच्या व्यक्तिनिष्ठेच्या मुळाशीं त्यांचें द्वैताचें तत्त्वज्ञानच असलें पाहिजे, ही गोष्ट स्पष्ट होते. महानुभावांच्यांत एकमेकांशीं संबंध असणार तो फक्त तत्त्वज्ञानापुरता. 'एक विचारसरणी' एवढेंच महानुभावाचें महानुभावांशीं नातें. ही विचारसरणी अंगिकारण्यासाठीं व ती पुढें चालू ठेवण्यासाठीं जेवढ्या गोष्टी करणें अटळ आहे, तेवढ्यावरूनच त्यांना 'पंथ' म्हणावयाचें. बाकी सर्वत्र व्यक्तिनिष्ठा. अशा या व्यक्तिनिष्ठ पंथाचें ध्येय काय होतें, त्या ध्येयाचें स्वरूप कसें होतें आणि तें मिळवावयाचे मार्ग कोणते, हे प्रश्न आतां ओघानेच येतात.

मोक्ष हें त्यांचें ध्येय आहे. त्यासाठीं अनुसरण केलें पाहिजे. अनुसरण म्हणजे चक्रधर सांगतील त्याप्रमाणेंच वागणें. "सर्वसंगपरित्याग केल्यामुळेच स्वातंत्र्याचा मोक्ष अधिकाधिक जवळ येतो. त्याप्रमाणें, ज्ञानियानें आता सर्वस्वाचा पाश तोडून परमेश्वरानुसरण केलेलें असल्याने त्याचींहि कांही बंधनें तुटून पडतात. ज्ञानियाला ब्रह्मप्राप्तीचा मोक्ष मिळविण्यासाठीं सर्व मळकर्मांतून मोकळें व्हावें लागतें. त्याशिवाय तो परमेश्वराच्या कृपेला पात्र होत नाही. त्याच्या ठिकाणचे जीवधर्मरूपी मळ (षड्रिपु, तोष, खंती, हर्ष, विषाद, वगैरे) आणि कुत्सितकर्म (अनुचित क्रिया, विषयांचे उल्लेख, अनुचित पुरुषांचा समागम) हीं नाहीशीं होऊन त्याने अस्तिपरीचें नीट आचरण केलें तरच परमेश्वर त्याला पुढील अपरोक्ष ज्ञान देतात. ही अस्तिपरी त्याला नीट आचरतां यावी म्हणून त्याच्या कर्मांची त्रिविधता सुरू होते. म्हणजे असें कीं, त्याचीं आगंतुक कर्में कुंठित होतात, अनारब्ध कर्में सुकून जातात; पण प्रारब्ध कर्मांचा मात्र त्याला भोग भोगूनच नाश करावा लागतो. अनुसरलेल्या ज्ञानियानें केलेल्या सर्वस्वत्यागाचें जणूं हें फळ परमेश्वर त्याच्या तावडतोब पदरांत

टाकतो...आवडपूर्वक अनुसरण असलें तर चौकडी नासते; एरवीं नाही. ' (म. त. प्र. ११ ). प्रेम मार्गानें जाणाऱ्या भक्ताच्या हातून या गोष्टी आपोआप घडत जातात. साहजिकच आहे, एकदां वृत्ति निश्चित झाली म्हणजे सर्व गोष्टी तिला अनुसरूनच घडणार. परमेश्वर मोक्ष देतो. तो ज्ञानियाला पाठीशीं घालतो, भक्ताला पोटाशीं धरतो. दोघांनाहि असें निकट सन्निधान मिळतें; पण तें या फरकानें. यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल कीं, मोक्षांतहि महानुभावांची व्यक्तिनिष्ठा कायमच आहे; इतर तत्त्वज्ञानांतील घटाकाशाच्या आकाशांतील किंवा मिठाच्या खड्याच्या पाण्यांतील लोपाप्रमाणे इथे कांहीहि लोप पावत नाही. महानुभावांचें द्वैत व व्यक्तिनिष्ठा मोक्षांतहि स्वतःसिद्ध आहे.

या द्वैतामुळे व त्यास अनुषंगानें येणाऱ्या व्यक्तिनिष्ठेमुळेच कीं काय, महानुभावांच्या मोक्षाच्या कल्पनेस अनेक मर्यादा पडल्या आहेत. ' अहं ब्रह्मास्मि ' असें म्हटल्यानें जीवाला ब्रह्मापुढें न्यूनगंड वाटण्याचें जें कारण उरत नाही, तें द्वैताच्या कल्पनेमुळे वाटतें, असा तर्क संभवतो. ( पहा—जीवु सर्व दोषांचे आळे ॥ २०२ ॥ विचार ). महानुभावांची ' प्रसादाची प्रार्थना ' वाचल्यावर हा तर्क बळकट होतो. ते प्रार्थनेंत म्हणतात, " ईश्वरा, तुझा जयजयकार असो. सच्चिदानंदस्वरूप देवा श्रीचक्रधरा, मी अनादिकाळापासून अपवित्र आहे. अज्ञान आणि अन्यथा ज्ञान यांनी मी अपवित्र झालों आहें. स्वोक्ति, शास्त्रोक्ति आणि लोकोक्ति यांच्यामुळे मी अपवित्र आहें. माझ्या ठिकाणीं अभिलाष, अहंता, ममता, काम-क्रोध-मद-मत्सर, रागद्वेष वगैरे असल्यामुळे मी अपवित्र आहें. इतकेंच नाही, तर मी अनंतसृष्टीचा प्रमादी आहें. श्रीचक्रधरा देवा, आता या सृष्टींत तुझ्या एकट्यावांचून आणखी कशानेंहि मी पवित्र होणें शक्य नाही. म्हणून श्रीचक्रधरादेवा, आपलें दर्शन देऊन, मला स्पर्श करून, माझ्याशीं बोलून, किंवा माझ्याकडे कृपादृष्टीने पाहून निदान मला अंतःकरणांत आठवून तरी माझ्यासारख्या अपवित्राला आता तूं पवित्र कर. रे परमेश्वरा, तुझे नाम, लीला, मूर्ति, चेष्टा, अवस्थास्थान, प्रसाद, वासनिक व भिक्षु यांचें सेवादास्य माझ्याकडून घडव आणि मला अपवित्राला पवित्र कर. "

या न्यूनगंडासारख्या भावनेमुळे ' पुष्कळ कांहीं तरी करावें तेव्हां मोक्ष मिळण्याची थोडी तरी आशा ' अशी भावना झाली असली पाहिजे, आणि

समाजनिष्ठेत अखिल समाजाचा विचार करावा लागत असल्याने समाजनिष्ठ आचारमार्गात जी सुलभता अपरिहार्यपणें येते ती व्यक्तिनिष्ठ तत्त्वज्ञानामुळे आवश्यक नसल्याने, महानुभावांच्या मोक्षमार्गास अधिकाधिक मर्यादा पडून तो दुर्लभतर झाला असला पाहिजे, असें वाटतें. सारांश, द्वैतामुळे व्यक्तिनिष्ठा व न्यूनगंड, आणि व्यक्तिनिष्ठा व न्यूनगंड यांच्यामुळे मोक्षाची दुर्लभता ( बाइ : ब्रह्मानुभूति : ते दुर्लभू ।। २८९ ।। नवप्रकरण. ) अशी ही एक एकसंध कारणपरंपराच आहे, असें मनांत आल्यावांचून राहत नाही व हा विचार या मुद्द्याचा तपशील पाहिला असतांना स्थिर होतो.

महानुभावांच्या मतें, प्रत्येक क्रिया ही उभयरूप म्हणजे संतासंतमिश्र असते. उदाहरणार्थ, 'देवतेप्रीत्यर्थ फुलें तोडणें ही क्रिया एका दृष्टीनें संतक्रिया आहे. कारण फुलें तोडणाराच्या मनांतील देवपूजेचा हेतु शुद्ध आणि पुण्यकारक असतो. पण त्याच क्रियेमुळे असंतनिष्पत्तीहि होते. कारण फुलें तोडतांना तेथील अनेक सूक्ष्मातिसूक्ष्म जीवांची हत्या होते. यज्ञांत बळी देणें ही क्रिया देवतेप्रीत्यर्थ असल्यामुळे ती संतक्रिया होय. पण त्याच क्रियेमुळे एका प्राण्याची हत्या होते म्हणून ती असंतहि होते, फार काय, पण बोलणें, चालणें, श्वास घेणें वगैरे क्रियाहि अशाच संतासंतमिश्र होत.' अशा रीतीने पुण्यक्रिया करतांनाहि कर्मांचे लेप चिकटत जाणारच आणि पुढें त्यांचा लोप करावा लागणारच. हेंच ' नुसत्या पापांबद्दलच नव्हे, तर पुण्यकृत्यांबद्दलहि म्हणजे देवतानिमित्ताने केलेल्या संतकर्मांबद्दलहि दुःख केलें पाहिजे. कारण त्या क्रिया कर्मरहाटीच्या संतक्रिया असल्या तरी दैवरहाटींत त्या ईश्वरप्राप्तीच्या आड येतात. या संतक्रियांचें क्षाळण अपरोक्ष ज्ञानांत करावेंच लागतें,' या वाक्यांत निःसंदिग्धपणें मांडलें आहे. ( पहा—तेथ समळा जीवा अधिकारु नाही ।। २१८ ।। विचार ).

" ज्ञानी, अज्ञानी, वेधवंत वगैरे सगळ्यांना परमेश्वराचें दास्य करतां येतें. बाइसांनी केवळ आवडीने परमेश्वराचें दास्य केलें. भटोबासांनी ज्ञानपूर्वक तर नाथोबांनी अज्ञानपूर्वक दास्य केलें. साधिकरणी पुरुषांनाहि वचनरूप परमेश्वराचें दास्य करतां येतें. तेवढ्याने परमेश्वर संतुष्ट होतो व त्या पुरुषाचा स्वीकार करून शेवटीं त्याला आपल्या अव्यक्त स्वरूपाची प्राप्ति करून देतो. म्हणूनच आचरत्या पुरुषाने अनन्य-

चित्तानें परमेश्वराचें व्हावें." या वाक्यांवरून कळून येईल कीं, मोक्षमार्ग येथे जरा सैल केलेला असला तरी वाटेल त्याला तो मोकळा नाहीं. 'अज्ञानी' हा शब्द या ठिकाणीं सामान्य, नेहमींच्या अर्थानें वापरलेला नाही, तर ज्ञान-मार्गाखेरीज इतर मार्गानें जाणारा, असाच त्याचा अर्थ असला पाहिजे. मोक्ष बालांना व वृद्धांना नाही. 'अवतार धारण केल्यानंतर अधिकारकाळीं म्हणजे बारा वर्षानंतरच परमेश्वर त्याचा स्वीकार करतो.' त्याचप्रमाणे अनु-सरण ५६ व्या वर्षापूर्वीच हवें. कारण, 'अनुसरून आचरण करायला आव-श्यक तेवढा काळ राहण्यासाठीं हीच आयुष्यमर्यादा योग्य आहे.' अशा तऱ्हेने १२ ते ५६ वर्षांतच मोक्षासाठीं प्रयत्न केले पाहिजेत.

आणखी असें कीं, परमेश्वर व जीव या दोघांनाहि आपली विशिष्ट योग्यता दाखविणें आवश्यक आहे. 'परमेश्वराने कर्मभूमीबाहेर अवतार घेतला तर तेथे सर्व देवतांच्या ओळगण्या त्याजजवळ राहणार नाहीत. त्यामुळे परमेश्वर 'अयुक्त' म्हणजे कांहीं ओळगण्याविरहित राहील. पण उद्धरण्यासाठीं परमेश्वर सर्व शक्तींनी 'युक्त' म्हणजे सर्व ओळगण्यासहित असावयास पाहिजे. तसेंच ज्याचा उद्धार करावयाचा तो जीवहि युक्त असायला पाहिजे. म्हणजे त्याच्या शरीरांत सर्व देवतांच्या पिंडस्था असल्या पाहिजेत; एरवीं त्याचा उद्धार होऊं शकत नाही. जीवाच्या देहांत सर्व देवतांच्या पिंडस्था केवळ कर्म-भूमींतच असूं शकतात. अर्थात्, उद्धरणाला पात्र असा युक्त जीव कर्म-भूमींत असल्यामुळे त्याला ज्ञान देण्यासाठीं आणि त्याच्याकडून आपली सेवा-दास्यादि कार्यें करून घेण्यासाठीं परमेश्वरालाहि कर्मभूमींतच मनुष्यावतार घ्यावा लागतो.' जीवाच्या युक्ततेचें स्पष्टीकरण पुढें दिलें आहे. 'ज्ञान-पात्रत्वासाठीं 'युक्त' म्हणजे सर्वावयवयुक्त व सर्व देवताधिष्ठानयुक्त पिंड असला पाहिजे; म्हणजे त्या शरीरांत सर्व पिंडस्था असल्याच पाहिजेत हें दिसून येईल. ......सर्व पिंडस्था असणें याचा अर्थ शरीराचे सर्व अवयव असणें. मनुष्याला सर्व अवयव असतील म्हणजे तो सर्व अवयवांनी 'युक्त' असला तरच ज्ञानादिकाचा त्याला स्वीकार करतां येतो. उदाहरणार्थ, एखाद्या मनुष्याला डोळे नसले तर तो परमेश्वरावताराला पाहणार कसा ? आणि परमेश्वराला पाहिल्यावांचून त्याला ईश्वरप्रतीति येणार कशी ? आणि त्याचें ध्यान तो करणार कसें ? त्याला कान नसेल तर परमेश्वरावताराकडून

किंवा अधिकरणाकडून त्याला ज्ञान 'श्रवण' करतां यायचें नाही, आणि परमेश्वर किंवा अधिकरण यांच्याद्वारें 'परेत' घोळलेल्या अक्षरांनी ज्ञान झालें तरच तें उद्धरणाच्या मार्गावर मनुष्याला नेऊं शकतें. या ठिकाणीं डोळे किंवा कान असणें म्हणजे शरिरांत नुसतीं इंद्रियें असून भागत नाही, तर त्या इंद्रियांचीं कार्यें होत असलीं पाहिजेत, आणि इंद्रियांचीं कार्यें त्या ठिकाणीं नियुक्त पिंडस्थांच्या म्हणजे देवतासामर्थ्यांच्या अधिष्ठानावांचून होत नाहीत. जी गोष्ट परमेश्वराच्या बाबतींत खरी आहे तीच देवतांच्या विद्यादिकासंबंधींहि खरी आहे. उद्धरणाला सर्वच जीव पात्र असतात असें नाही, तर फक्त मनुष्यजीव पात्र असतात.' जीवाचे अनधिकार पुढें दिले आहेत. 'वेडे, पिसे, आंधळे, मुके, बहिरे यांच्या ठिकाणीं मनुष्यदेहाचें युक्तत्व नसतें ... असे अयुक्त जीव परमेश्वराचें ज्ञान ग्रहण करून तदनुसार आचार करायला असमर्थ असतात. (आ. मा. १५०). ज्यांच्या ठिकाणीं रजोगुण व तमोगुण यांचें प्राबल्य असेल, जे हृदयशून्य, भक्तिजड किंवा कर्मजड असतील आणि जे वयोवृद्ध जरठ झाले असतील, त्यांनाहि परमेश्वराचें ज्ञान होऊं शकत नसल्यामुळे धर्माचा अधिकार नाही. (आ. मा. २४२ व वि.२५७). मनुष्याच्या मनांत असलेले रजतमरूपी मळ (राजस व तामस भावनांविषयीं अंतःकरणाचा वेच) आणि सप्तव्यसनादि कर्में (तस्करत्व, पुंश्चलत्व वगैरे) हीं नाहीशीं झाल्यावांचून मनुष्यजीव परमेश्वराच्या बोधरूपी कृपेला पात्र होत नाही. परमेश्वराविषयी दोष मनांत आणणें, त्याच्यावर विपरीत भावना करणें, तीर्थक्षेत्रादिकाला जाणें, ही रजतमाचीं कार्यें होत. (पुरुषोत्तम क्षेत्राः न वचावे ।। १३४।। आ.मा.) महदाइसेच्या ठिकाणीं हे दोष होते. ते नाहींसे झाल्यावरच परमेश्वराने तिला बोध दिला.—सारांश, जे सात्त्विक आहेत अशांनाच परमेश्वरधर्माचा किंवा ज्ञानाचा अधिकार आहे.'

जीवांनीं परमेश्वराची कणव जोडली तर 'नाना तऱ्हांनी अयोग्य माणसांना योग्य करून कृपा-साह्याने त्यांना शोधून परमेश्वर मनुष्यजीवांना ज्ञान देतात,' म्हणजे ज्ञान झाल्यावर आचारमार्ग चालण्याची पात्रता येते, परवानगी मिळते; पण आचारधर्म फक्त समर्थांसाठींच असतो, हें लक्षांत हवें. 'अशक्तासि विधि नाही.' (आ. मा. २८). 'स्वभावांना मात्रा देऊं न ते सुकर्णें केव्हांहि चांगलें. पण त्याहि स्थितींत धर्माचरणाचें सामर्थ्य मा *

साधकाच्या ठिकाणीं असलेंच पाहिजे,' हें विसरतां कामा नये. पण या धर्माचरणाची विवक्षा ' स्मरण हाच त्याच्या ( साधकाच्या ) जीविताचा मुख्य हेतु आहे, ' ही आहे आणि म्हणूनच त्याने पूर्णपणें प्रेतवत् होऊन राहावें, असें सांगितलें आहे. म्हणजे स्मरण करण्यापुरती तेवढी शक्ति–किंवा धुगधुगी–अंगांत असावी. ( देहाची अनास्था होआवी ॥ १३९ ॥ आ. मा. )

आतां प्रतिदेह आणि मोक्ष यांचे संबंध पाहूं. विचिकित्सारूप विकल्पाचें फळ म्हणून जीवाला मृत्यूनंतर प्रतिदेह मिळतो. त्यांत हत्तीएवढें शरीर, त्यावर रांजणाएवढें डोकें, बोटाएवढी मान आणि आंत सुईच्या छिद्राएवढा गळा असतो; आणि याचा शक्य त्या पद्धतींनीं छळ होतो. ' नुसत्या मानासिक विकल्पामुळे किंवा विकल्पाच्या उल्लेखामुळे जीवाला प्रतिदेह मिळून इतकें दुःख सोसावें लागतें. मग उल्लेख रसरूप होऊन कार्याला आला तर किती दुःख सोसावें लागत असेल, याची कल्पनाच करावी ! प्रत्येक विकल्पपरत्वें नवीन प्रतिदेह आक्षेपत नाही; तर प्रतिदेह एकच, पण नवीन विकल्पाने दुःखाची तीव्रता वाढते इतकेंच. ( म्हणजे, होणाऱ्या सर्व शिक्षा एकाच वेळीं भोगायच्या ! ) हा प्रतिदेह कशाने नासतो ?–विपरीत अनुष्ठानाने, ईश्वरदास्याने व पुरभजनानेहि तो नासत नाही; तो फक्त कांही काळपर्यंत प्रतिबंधतो. मनुष्य पूर्णपणें निर्विकल्प बनला तर मात्र त्याचा प्रतिदेह नासतो. आपल्या शेंबड्यालेंबड्या मलमूत्राने भरलेल्या मुलाला पोटाशीं धरल्याने आईला विटाळ वाटत नाही, किंवा शिसारीहि येत नाही. त्या वेळीं ती जशी निर्विकल्प असते तशा नित्यनिर्विकल्प माणसाचा प्रतिदेह नासतो. पण कांही काळ निर्विकल्प राहून पुढें विचिकित्सारूप विकल्प केला तर मात्र प्रतिदेह चुकत नाही. तथापि, मृत्यूच्या शेवटच्या घटकेला निर्विकल्पत्व बाणलें अथवा भावे सणांत जोग्याचें सोंग घेऊन निर्विकल्प क्रिया आचरली म्हणजे निर्विकल्पतेचें सोंग करून विटाळचांडाळ न मानतां ब्राह्मणाप्रमाणेंच मांगाचेंहि सदन्न किंवा कदन्न स्वीकारलें आणि त्या स्थितींत मृत्यु आला तरीहि प्रेतत्व नासतें ! ' दशक्रियेनें म्हणजे मृत्यूनंतरच्या पहिल्या दहा दिवसांत भजन ( म्हणजे भोजन ) घातलें गेलें तरीहि प्रतिदेहाचा नाश होतो.

प्रारब्धकर्माचा नाश भोग भोगूनच करावा लागतो. असतीपरीचें महत्त्व वर्णन करतांना म्हटलें आहे कीं, ईश्वराचें ज्ञान हा अच्युतपदप्राप्तीचा एक

उपाय असून तें मोचक आहे हें खरें; पण जीवाला ईश्वराचें ज्ञान झालें म्हणजे तो सर्वस्वीं उद्धरला गेला असें मात्र नाही. ज्ञान मिळाल्यानंतर त्याने सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला अनुसरलें पाहिजे. अनुसरल्यानंतर याच देहीं अपरोक्षज्ञान प्राप्त होईपर्यंत अथवा दुसऱ्या जन्मांत परमेश्वराचा पुन्हा संबंध होऊन मग अपरोक्षज्ञान होईपर्यंत असतीपरीचा आचारधर्म पाळला पाहिजे.

'पण नुसतें अपरोक्षज्ञान झाल्याने संपलें असें नाही. त्यानंतर त्याने परमेश्वराच्या सान्निध्यांत त्याच्या सेवादास्याने आणि परमेश्वराच्या असन्निधानांत बहुरूपतेने व बहुकामतेने आपल्या अशेष कर्मांचा नाश करून सामान्यज्ञान मिळविलें पाहिजे; मग परमेश्वरप्रवृत्तीने आपल्या प्रत्येक मळाचें स्वतंत्र रीतीने, याप्रमाणे सर्व मळांचें क्षाळण करून विशेषज्ञान मिळविलें पाहिजे. तदनंतर कृपास्पदीचें दुःख अनंतकाळ भोगल्यावर परमेश्वराच्या कृपाशक्तीने मूळ विद्येचा छेद करून घेऊन त्याला मायापारंगत व्हावें लागतें, त्यानंतर त्याच्या अनुभवअज्ञानाचा नाश व्हावा लागतो, आणि मग कुठें ईश्वर त्याला आपल्या स्वरूपांत रममाण करतात.'

भक्तालाहि हें सर्व करावेंच लागतें. पण 'त्याच्या बाबतींत त्याला परमेश्वराचें निरंतर सन्निधान असल्यामुळे या सर्व गोष्टी आपोआप म्हणजे त्याला फारसे प्रयास न पडतां, सिद्ध होतात. पण ज्ञानियाला मात्र या सर्व गोष्टी स्वतः शारीरिक कष्ट सोसून, आचार करून पार पाडाव्या लागतात. त्याशिवाय त्याचें उद्धरण होऊं शकत नाहीं.'

उद्धरणासाठीं जन्म क्षेपावा लागतो. क्षेपण्याचा निश्चित विधि आहे. 'शारीर कष्टः मानसिक दुःख यातें जन्मक्षेपणें बोलिजे', असें म्हटलें आहे. (श्री. आ. मा. ४१). सुखसाधनांनी देव मिळत नाही. (सुखसाधने देवो न पवीजे नाएका : आ. ७९). जितकें जास्त दुःख तितकीं जन्मजन्मांतरींचीं अनंत दुःखफळांचीं कर्में नासतील; परमेश्वराच्या गोत्रियांवर परमप्रीति केल्याने प्रीति करणारांची अयोग्यता नासते. अर्थात् प्रीति करतांना जे दोष घडतील अशाच दोषांची अयोग्यता नासते. 'विकल्पदोषांबद्दल मात्र क्षमा न करतां परमेश्वर त्याचा (म्हणजे त्या दोषी जीवाचा) तत्काळ त्याग करतात. उलट विकार आणि हिंसा आचरणारे प्रमादिये यांनी जर अनुताप-

पूर्वक पुरश्चरण केलें तर ते स्वीकारांत पडतात. त्यांच्या दोषाच्या पुढील प्रसवाची चाल मोडते. पण लागलेला दोष मात्र पुसला जात नाही. त्यांतहि त्यांनी परमेश्वराला आलेली खंती विशेष आचरणाने परिहर केली तर त्यांना देहविद्या होऊं शकते. नंतर केलेल्या गोमत्या दोषाचा अर्धा प्रसव पारखतो आणि जीवाने, त्या दोषाबद्दल अंतःकरणपूर्वक अनुताप केला तर सगळाच प्रसव पारखतो. दोषाच्या प्रमाणांत प्रायश्चित्त हवें.'

साधकानें परमेश्वराच्या विरहाबद्दल निरंतर दुःख केलें पाहिजे. 'मनुष्यत्वाचा लेप निघण्यासाठीं साधारण पुण्यहेतूने भूतभजन घडलें पाहिजे. त्यांत ज्या व्यक्तीच्या ठिकाणीं भजन घडलें, ज्या स्थळीं, ज्या पदार्थांनीं व ज्याच्याकडून घडलें त्या सर्वांच्या राजस, तामस व सात्त्विक गुणांच्या संमिश्रणानुसार त्या पुरुषाला विशिष्ट स्वभाव पात्र होईल व तदनुसार बहिर्यागाचें आचरण घडेल. त्याला पुढें प्राप्त होणाऱ्या मनुष्यदेहाचें सुरूपत्व, कुरूपत्व, सलक्षणत्व, अवलक्षणत्व, युक्तत्व किंवा अवयवहीनत्व, स्त्रीत्व, किंवा पुरुषत्व भूतभजनाच्या पात्रावर अवलंबून राहील. ज्याच्या ठिकाणीं भजनक्रिया घडली तो पुरुष किंवा ती स्त्री जशी सुरूप किंवा कुरूप असेल तसाच सुरूप किंवा कुरूप अशा पुरुषाचा किंवा स्त्रीचा देह याला प्राप्त होतो. वंचकत्वानें भोजन घातलें तरीहि स्त्रीचाच देह मिळतो. ईश्वरावर प्रतीतिपूर्वक वेध असणें ही महत्त्वाची गोष्ट आहे. केवळ ज्ञानी म्हणजे बोधवंत असून त्याच्या ठिकाणीं वेध नसेल तर, तसेंच वेध नसून तो नुसता अनुसरलेला असेल तर, चौकडीचा दुःखभोग चुकत नाही. त्याला अपरोक्ष ज्ञानांत तो क्षाळावा लागतो.'

'ज्ञानियाला प्रेमाचे उपाय करतां येतात, नाही असें नाहीं; पण ते शाब्दज्ञानांत, किंवा अपरोक्षज्ञान प्राप्त होण्यापूर्वींच. पण एकदां त्याला अपरोक्षज्ञान प्राप्त झालें कीं, तो कायमचा दृढ ज्ञानिया बनलाच म्हणून समजा. मग त्याला कोणत्याहि रीतीने प्रेमाचे उपाय करतां येत नाहीत. अर्थात् ईश्वरानुभूतीपासून तो आता कायमचा मुकला. आपल्या डोळ्यांसमोर गाठव भुंकत असतांनादेखील त्याला चोरांनी न्यावें पण आपणांला कांही करतां येऊं नये, त्याप्रमाणे अपरोक्षज्ञानियाला प्रेमाचे उपाय करतां येत नाहीत. प्रेमाधिकारियाला ज्या देहांत प्रेम मिळतें त्याच देहांत त्याचें शाब्द चरित होऊन तो अपरोक्षाला पात्र होतो असें नाही. अनेकदां अपरोक्षाला पात्र होण्यापूर्वींच भक्ताचा मृत्यु होतो.

उदाहरणार्थ, वरंगळचा एकांकी भक्त व नागांबिका ऊर्फ बाइसा हे दोन्ही भक्त अपरोक्षप्राप्तीपूर्वीच मृत्युवश झाले होते. त्यांनी ईश्वरवियोगाच्या खोट्या बातमीने प्राणत्याग केला होता. एकदां अपरोक्ष झालें म्हणजे त्याच देहीं मुक्ति मिळते; पण अपरोक्षापूर्वी मृत्यु आला म्हणजे पहिल्या देहांत शाब्द पूर्ण न झालें तर ज्ञानियाप्रमाणेच भक्तालाहि पुनःसंबंधाचा देह मिळतो.'

सामान्यतः ज्ञानियाप्रमाणेच भक्तालाहि नवीन देहांत बाराव्या वर्षानंतरच परमेश्वराचा पुनः संबंध होतो. याला 'पुनःसंबंधिया भक्त' म्हणतात. 'विपरीत धर्मानुष्ठानाने ज्याची चौकडी चुकलेली आहे अशा जीवाला कृतयुग येईपर्यंत अवगळेंत ठेवलें जातें. प्रमादिया जर उपरतीनंतर आपली अधिक किंवा समान वृत्ति आचरतांना आपल्या प्रमाददोषाच्या दर्शनाने व ईश्वरांतराय आपणाला घडला म्हणून अंतर्दुःख करून नेहमीं तळमळत राहील आणि तळमळत तळमळतच प्राण सोडील तर त्याला देहाच्या पालटी देहविद्या मिळून पुढील सृष्टीच्या आरंभीं परमेश्वर प्रेम देतील.' त्याचप्रमाणे एखाद्या ज्ञानियाच्या दुःखप्रसंगीं किंवा मृत्यूप्रसंगीं आपला स्वतःचा देह वेंचणें, त्यासाठीं आपला देह समर्पण करणें हाहि प्रमादियाला प्रेमाचा उपाय आहे. यानेसुद्धां देहविद्या मिळून पुढील सृष्टीच्या आरंभीं त्याला प्रेम मिळतें.

जीवाला शाब्दज्ञान झाल्यावर व तदनुसार त्यानें आचरण केल्यावर परमेश्वर त्याला पुनःसंबंध देतात. आहाराच्या कमीअधिक प्रमाणावर पुनःसंबंधाचा काळ अवलंबून असतो. त्याचा तपशील (१) चतुर्थांशी–१२ वर्षें, (२) अर्धाहारी–१३ वर्षें ४ महिने, (३) पाऊणाहारी–१४ वर्षें ८ महिने, (४) संपूर्णाहारी–१६ वर्षें, (५) दरिया–२० वर्षें, (६) अनधिकारी–२४ वर्षें, (७) त्रसाचा – २८ वर्षें, (८) डिंगरा –३२ वर्षें, (९) इशाळु–३६ वर्षें किंवा पुढें.

आता महाराष्ट्र–संस्कृतीकडे वळूं, म्हणजे महानुभावांना महाराष्ट्रांत स्थान कां मिळालें नाही हें कळेल. खरोखर पाहतां महाराष्ट्र संस्कृतींत वाढलेल्या कोणाहि डोळस माणसास वरील चर्चा वाचत असतांनाच महानुभावांचा पराभव कां झाला हें दिसून येईल. त्यामुळे यापुढील चर्चा फारशी विस्ताराने करण्याचें कारण नाही; अत्यावश्यक तेवढेच दाखले दिल्याने भागेल. आणखी असें की, महाराष्ट्रांतील महानुभावेतर सर्व प्रमुख पंथांत घनिष्ट मैत्री असल्याने

यापुढील विवेचनांत त्या सर्वांचा समुच्चयानेच विचार करणें योग्य होईल असें वाटतें.

महानुभावेतर सर्व प्रमुख पंथांना ' अवघ्या ' जगाचें भलें व्हावें ही तळमळ लागून राहिलेली दिसते. ' माझेया विस्तारलेंपणाचेनि नांवें । हें जगचि नोहे आघवें, ' असें स्वतः ईश्वर ज्ञानेश्वरींत सांगत आहेत. त्यामुळें ईश्वरावर प्रेम म्हणजे सर्व चराचरावर प्रेम हें समीकरणच झालें. म्हणूनच नामदेवांनी ' अवघा संसार सुखाचा करीन । अवघ्या भावें धरीन विठ्ठल एक ' असा निश्चयच केला, तुकारामांनी ' ऐसें भाग्य कई लाहाता होईन । अवघे देखे जन ब्रह्मरूप ' अशी तळमळ व्यक्त केली आणि ' अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ' रामदासांनी मनांत धरली. साहजिकच लोकसंग्रह हें आवश्यक कर्तव्य झालें. ' भूतां परस्परे जडो मैत्र जीवांचे ' ही ज्ञानेश्वरांची इच्छा होती. जीवांनी मैत्री जोडावी म्हणून देवांच्या मैत्रीचें गुणवर्णन करण्यांत आलें; श्रीरामचंद्र व श्रीचंद्रमौलि, आणि दत्तात्रेय व परशुराम यांच्यांतील सख्यभक्ति लोकांपुढें मांडण्यांत आली. रामदासांनी खऱ्या व नकली मैत्रींतील फरक समजावून सांगितला. सत्संगाचा महिमा अर्थातच या सर्वांनी तोंडभरून गायिला आहे. अनसूयेने ' स्वर्ग कोणता ' असें विचारलें असतां ' सत्संग हा स्वर्गच आहे, ' असेंच दत्तात्रेयांनी सांगितलें.

महाराष्ट्राचें समाजसंपर्कावांचून चालणारच नव्हतें. त्यास समाजापासून दूर राहायचें नव्हतें. ' जे प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांहि कर्तव्य असें उरलें । लोकांलागी ।। ' असें ज्ञानेश्वरांनीं निःसंदिग्धपणें सांगितलें. अर्थातच लोकांत मिसळावयाचें म्हणजे लोकांना आपल्याविषयी मुळींच किळस वाटणार नाही, उलट आकर्षण वाटेल, असेंच आपलें स्वरूप हवें म्हणून रामदासांनीं ' विमलते 'वर भर दिला आहे. त्यांचें ब्रह्मदेखील ' विमल ' ! ' गीत हा विषय आहे ', म्हणून महानुभाव गीतगायनीं निराकरण करीत तर, ' आवडी सकळै लोकां । प्रीतीने भजती जनीं । इच्छिले पुरविती सर्व । धन्य ते गायनी कळा ।। येकाकी महंती येते । उदंड कीर्ति वाढते...' म्हणून रामदासांनी गायनाचा पुरस्कार केला. लोकांना आपल्याविषयी आपुलकी निर्माण करून लोकांचें कल्याण करावयाचें, घडवा-

वयाचें असेल तर परोपकार केला पाहिजे, हें ओघानेच आलें. ‘ ठाकला तो कांही केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनी ’ असें तुकारामांनी सांगितलें. ‘ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती उपकारें ’ हे उद्गार परोपकाराची आवश्यकताच प्रतिपादन करतात, कारण संत हा शब्द अनेकदां गौरवार्थी वापरला जातो. जे संत झाले होते त्यांनीहि एकत्रच राहावयाचें होतें. ज्ञानेश्वर आपले ज्येष्ठ बंधु व गुरु निवृत्तिनाथ यांच्यासह इतर भक्त-मंडळाला बरोबर घेऊन तीर्थयात्रेस गेले होते. रामदासांच्या वाङ्मयांत तर समुदाय करण्याची वृत्ति सर्वत्रच आहे. ‘ कांही समुदाव करणें । येविषी आलस्य न करणें । आलस्य करितां उदंड उणें । दिसेल परमार्थी ॥ ’ असें सांगून त्यांनी समुदाय हा परमार्थासाठींसुद्धां हवाच, असें आग्रहाने लिहिलें आहे. एके ठिकाणीं तर ‘ ब्रह्मारण्य सेवी तो साधु येकला । जना नाही आला उपेगासी ’ असा त्यांनीं एकटेपणाचा निषेध केला आहे. सारांश, समाज-संपर्काची आवड, समाजांत मिसळण्याचा आग्रह, लोकांना आपला सहवास चांगला वाटावा ही इच्छा, समाज करून राहण्याची वृत्ति व लोकांसाठीं कष्ट करण्याची तयारी, हे महाराष्ट्राच्या मनाचे धर्म आहेत. हे गुणधर्म म्हणजेच समाजनिष्ठा.

समाजनिष्ठा हा महाराष्ट्राचा प्राण आहे. महाराष्ट्रांतील सर्व थोर लोकांना नेहमीं स्वतःपेक्षा स्वतःच्या भोंवतालच्या लोकांची चिंता जास्त वाटत आली आहे. ‘ मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रथन मिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथ ’, या ज्ञानेश्वरांच्या ओंवींत हेंच स्पष्ट नाही काय ? ‘ बुडती हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा म्हणऊनि । ’ या उद्गारांत तुकारामांच्या हृदयाचा कनवाळूपणा किती सुंदर व्यक्त झाला आहे ! ‘ देशकाल वर्तमाने । आपण चिंताग्रस्त होतीं मनें । म्हणती कैसी वांचतील जनें ?... कैसी क्षेम राहील जगतीं ? कैसी देवदेवालयें तगतीं ? कैसे कुटुंबवछल लोक जगती ? कोणेकडे जातील हे ? ’ हे रामदासांचे बोल ऐकून आपण आजहि अस्वस्थ होतो. केवढी हृदयाशीं भिडलेली ही समाजनिष्ठा ! यांतून दुबळे, डोक्याने कमी असणारे लोक वगळलेले नाहीत. ‘ पोहणारें बुडते तारावें । सामर्थ्यें बुडों नेदावें । मूर्ख ते शहाणे करावें । विवेकी पुरुषें ॥ ’

संतांची ही उत्कट समाजनिष्ठा जातिवंत असल्याने त्यांच्या वैयक्तिक

जीवनांतहि तीं उत्कृष्टपणें प्रतिबिंबित होत आहे. ज्ञानेश्वरांनी व त्यांच्या बंधूंनी नाथपंथ स्वीकारला; कारण इतरत्र जी झाली नसती ती मुक्ताबाईची सोय त्यांत होत होती आणि मुक्ताबाईची अशी चांगली सोय लावल्या-शिवाय राहणें या भावंडांच्या मनोवृत्तींत नव्हतें, असें सारस्वतकार भावे म्हणतात. तुकारामांनी प्रयाणाच्या वेळीं पत्नीस ' तुझ्या गर्भी नारायण आहे ' असें सांगून तिची काळजी घेण्याविषयी इतरांस विनंती केली. रामदासांनी पुरश्चरण व तीर्थाटण झाल्यावर घरीं येऊन आईच्या डोळ्यांचें पारणें फेडलें आणि बंधूंच्या मुलांस प्रेमाने श्लोकबद्ध उपदेश केला. रामदासांच्या शिवाजीवरील प्रेमास तर उपमाच सुचत नाही; तसें प्रेम तेंच !

चक्रधर मात्र पुनः आपल्या घरीं गेल्याचें ऐकिवांत नाही. कसें असेल ? कारण तें त्यांच्या तत्त्वज्ञानास सोडून होतें. महानुभावांच्यांतहि कांही ठिकाणीं प्रेमाचे संबंध दिसतात. उदाहरणार्थ, ' वच्छहरण ' लिहिलें दामोदरपंडि-ताने पण कवीचें नांव घालतांना ' म्हणे मुनी केशीराजु ' असे शब्द घातले. पण हें अपवादात्मक कां म्हणूं नये ? शिवाय या प्रकारच्या प्रेमाचा अंतर्भाव तत्त्वज्ञानांत हवा. जिथे माणसें आहेत तिथे प्रेमाचे संबंध दिसणारच. कारण तो मानवी स्वभाव आहे. पण पंथाबाहेरचेच काय, पंथांतील लोकहि वर्तणुकीचा विचार करतांना तत्त्वज्ञानांत जें कांही सांगि-तलें असेल त्यासच प्राधान्य, नव्हे, सर्वच महत्त्वहि देणार, ही गोष्ट खरी नाही काय ? आणखी असें कीं, महाराष्ट्रीय संतांच्या बाबतींत हें प्रेम, ही दुसऱ्याविषयी स्वतःपेक्षा जास्त वाटायची कळकळ, मनुष्यमात्रापुरती मर्यादित नव्हती, तिचा विस्तार सर्व सृष्टींत होता. रेड्याचे हाल बघून रेड्याचे हाल बघण्यापेक्षा स्वतःचे हाल सोसवतील असेंच ज्ञानेश्वरांस वाटलें. नामदेव कुत्र्याने पळवलेल्या पोळीवर तूप घालायला त्याच्यामागे धांवले. चक्रधरांच्या मनांतहि करुणा ओतप्रोत होती; कुत्र्याला लागलेला मार जणूं आपल्याला बसला असें त्यांना वाटलें, हें खरें; पण अशा स्वरूपाची हिंसा करूं नये म्हणून विलक्षण नरकाची भीति दाखविण्याचा जो द्राविडीप्राणायाम त्यांना करावा लागला आहे तो या संतांच्या बाबतींत सर्वथा अनवश्यक होता; कारण त्यांना जग विष्णुमयच वाटत होतें. तळ-मळणारें गाढव पाहून एवढ्या दूर ठिकाणाहून प्रयासाने आणलेली मोजकी

महत्त्वाची गंगा नाथांनी त्या गाढवाच्या तोंडांत ओतली. त्याचें वर्णन मयूरकवीने—

पाणी एकोपंत द्रवुनि विकळ तृषित रासभा पाजी ।
तें लक्ष विप्रभोजनसम झालें, म्हणति साधु, बापाजी ।।

असें केलें आहे ! पण महानुभावांत जर असा कावड वाहण्याचा आचार असता, तर त्यांच्या, भावनांपेक्षां आचारकांडास महत्त्व देण्याच्या रीती-प्रमाणे, हा प्रकार चूक ठरल्यावांचून राहिला नसता. तसेंच, भुकेले जीव पाहून एकनाथांनी जातगोत, पात्रापात्र न पाहतां भोजन घातलें; महानु-भावांच्या कल्पनेप्रमाणे एकनाथांना पुनःसंबंधांत या खालच्या जातीचा कुठला तरी देह मिळेल. अशा रीतीने, महानुभाव पंथ महाराष्ट्राच्या समाज-निष्ठ मनोवृत्तीशीं संपूर्णपणें विसंगत असल्याचें दिसून येईल. ज्या वेळीं माणूस निःस्वार्थीपणें इतरांची चिंता दूर करून सर्वांना ईश्वरकार्य समजावून देण्याचें आणि सर्वांच्या भल्याचें कार्य करीत कष्टत असतो, त्या वेळीं त्यास त्याचें कार्य चूक आहे असें सांगणें हें कोणीहि झाला तरी कसें सहन व्हावें ? म्हणूनच महानुभाव पंथीयांच्यावर महाराष्ट्रीयांनी प्रखर टीका केली असली पाहिजे, हें अगदीं सरळ आहे. त्यांतहि महानुभा-वांचें वागणें असें कीं, ' इतरांशीं प्रिय बोलावें, पण उपयोगी पडूं नये. ' यावरूनच ' मानभावी कावा ' हा वाक्प्रचार आलेला असणें संभवनीय नाही काय ?

महानुभाव हे द्वैती कसे आहेत आणि त्या द्वैतामुळे त्यांच्या विचार-आचारावर कसा परिणाम झाला आहे, हें आपण पाहिलें. महाराष्ट्रांतील इतर सर्व प्रमुख पंथ अद्वैतवादी आहेत.' तैसा मज एकाचा विस्तारु ।तें हें जग' असें देवाचें आणि जगाचें ऐक्य ज्ञानेश्वरांनी पूर्णपणें पुढें मांडलें आहे. पिंड आणि ब्रह्मांड यांत असेंच नातें आहे, हें दत्तसांप्रदायिकांनी सांगितलें आहे. तुकारामांस अद्वैतसिद्धान्त मान्य आहे; पण ' अभेदूनि भेद राखियेला आंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ', असें त्यांचें मत आहे. संतमुमुक्षुवादांत रामदासांनी अद्वैत मान्य केलें असून, ' राम तो जाणिजे आत्मा । सर्वांत-रात्मा तोचि तो । ' असें स्पष्टीकरण चतुर्थमानांत दिलें आहे. या अद्वैता-मुळे अर्थातच जीवास हीनगंडासारखी भावना बाळगण्याचें प्रयोजन पडत

नाही. आपण ब्रह्म आहोंत ही कल्पना आरोग्यपूर्ण वाटते. तिच्यामुळे व समाजनिष्ठेत संबंध समाजाचा विचार करावयाचा असल्याने, ज्याप्रमाणे नौदलाचा वेग सर्वांत हळू चालणाऱ्या बोटीवरून ठरवतात, त्याप्रमाणे मोक्ष-मार्ग सुलभ झाला आहे. अद्वैतामुळे समाजनिष्ठा व मनाचें आरोग्य, आणि समाजनिष्ठा व मनाचें आरोग्य यामुळे मोक्षमार्गाची सुलभतरता, अशी ही येथील कारणपरंपरा आहे.

ज्ञानेश्वरांनी मोक्ष मुक्तद्वार केला, ही त्यांची अत्यंत मोठी कामगिरी होय. ' तुम्हा वर्णविशेषवसे । आम्हीं स्वधर्मू विहिला असे । एयाते उपासा; मग आपैसे । पुरती काम ' असें त्यांनी सांगितलें. चोखयाच्या ' महारी 'ने ' नाम निज नौका । विठ्ठल हें तारू । भवाचा सागरू । उतरील । ' असें विश्वासपूर्वक म्हटलें. एकनाथांची कामगिरी सारस्वतकारांच्या पुढील शब्दांत उत्तम रीतीने व्यक्त होतेः " आंधळे, पांगळे, थोटे यांनाहि ईश्वरप्राप्ति होईल, खटनट, भोळे-भाबडे, अज्ञान, अनाथ, अपंग हेहि तरून पार होतील, असा मार्ग दाखविणें अवश्य आहे, हें तीर्थयात्रेंत जगाची स्थिति निरखून पाहत असतां नाथांच्या लक्षांत आलें व त्यांनी सर्वांना सहज साधितां येईल, असा भागवतधर्म स्पष्टपणें दाखवून दिला. " लहान मुलांसाठींहि त्यांनी अनेक प्रकारचें भारूड लिहिलें. तुकारामांनी, ' ब्राह्मणक्षेत्री वैश्य शूद्र । चांडाळाहि अधिकार । बाळें नारीनर । आदिकरून वेश्याहि ' या शब्दांनी तेंच सांगितलें. ' नलगती सायास । जावें वनांतरा । सुखें येतो घरा । नारायण ' आणि ' नलगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म । आणिक न करावे श्रम । पुरें एक नाम विठ्ठलाचें ' यांत सुलभतरता स्पष्टच आहे. ' ज्याने उठावें त्याने गळ्यांत तुळशीमाळा घालावी आणि हातीं टाळ घेऊन विठोबा-च्या भजनास लागावें ', या भाव्यांच्या एका वाक्यांत या मुद्द्याचा सर्व सारांश आला आहे. ' श्रीशिवलीलामृत ' लिहून मोक्ष मुक्तद्वार करण्याचेंच कार्य श्रीधरांनी फार मोठ्या प्रमाणावर केलें. कारण त्यांत नकळतच काय, पण अयोग्य हेतूनेहि नाम घेतलें असतां तें फलदायक होतें; एवढेंच नव्हे, तर अनाचाऱ्याच्या प्रेताला कुत्र्यासारख्या प्राण्याकडून जातां जातां भस्म लागलें तरी त्यामुळे तो मोक्षमार्गास पात्र होतो व यास कोणत्याहि अटी नाहीत, वगैरे तत्त्वें सांगणाऱ्या गोष्टी आहेत. हा अगदीं कळसच झाला !

हें वाचून महाराष्ट्रीयांनी मोक्षमार्ग भलताच स्वस्त केला, असें कुणी म्हणेल. पण यांत एक चांगला विचार दिसण्याजोगा आहे. महाराष्ट्रीय लोकांना कलहशील म्हणणारे कोण असतील ते असोत; पण मराठी वाङ्मय वाचीत असतांना मराठी मनाचा अभिजात प्रेमळपणाच सतत दिसतो. प्रेमळतेचा सुंदर प्रवाह सर्व मराठी वाङ्मयांतून अविरत वाहत आहे.' माझ्या भोंवतालीं दिसणारे हे सर्व जीव माझेच आहेत, मला ते हवे आहेत, मी त्यांच्यासाठी लागेल तें करीन ', ही भावना म्हणजेच हा प्रेमळपणा. माझीं माणसें कशींहि असलीं तरी तीं माझीं आहेत, ही यामागील कल्पना आहे. मला एकट्याला मोक्ष नको, मोक्ष सर्वांना असूं दे, असें महाराष्ट्रीयांचें मागणें आहे. कोणताहि आनंद मराठी माणसाला एकट्यानेच भोगवणार नाही, मग मोक्षच त्याला अपवाद कसा ? म्हणून जरा चांगुलपणा असला की तो मोक्षाला पात्र होतो. मग भक्त हे पायावर डोकें ठेवण्याच्या योग्यतेचे वाटल्यास नवल काय ? जीवितांचें जें ध्येय तें सर्व संतांना प्राप्त झालें होतें, तरीहि ते लोकांत राहिले तें लोकांवरील प्रेमामुळेच. त्यांना एकेकट्याने मोक्ष मिळवून स्वस्थ होतां आलें नसतें काय ? पण त्याने त्यांना चैन पडणार नव्हतें. ' देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी ' असें समर्थ म्हणतात खरें; पण तें योग्य काळीं. ज्ञानेश्वरांनी त्यांचे अनेक जिवलग ' जाला जैसा वर्षाकाळु । खवळणें मेघा ' असे अश्रु गाळीत असतां समाधि घेतली हें खरें; पण ती ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथलेखनाने या जगांतलें कार्य संपल्यावर मगच. त्यांना, ज्या ज्ञानामुळे मोक्ष होतो तें ज्ञान केव्हांच झालें होतें ! समर्थांनी जसें ' तरी मी ग्रंथाकारें आहेच ' असें सांगितलें, तसें ज्ञानेश्वरहि सांगत आहेत जणूं. महाराष्ट्रीयांच्या या हळुवारपणावरून एक निराळा मुद्दा सुचतो. महाराष्ट्रीय खरोखर इतके हळवे कीं, त्यांना दुसऱ्याचें दुःख जणूं आपलेंच वाटतें. सर्व संतांच्या चरित्रांत हें डोळे भरून पाहायला सांपडतें. या गुणामुळेच महाराष्ट्रीयांना अद्वैत तत्त्वज्ञान ताबडतोब पटलें असावें. अद्वैत तत्त्वज्ञान वाचल्यानंतर मग जगांत आपलींच रूपें दिसूं लागलीं असें झालें नसून जगांत आपलेंच रूप दिसत असल्याने त्यांना अद्वैत सहजच पटलें, असें झालें असावें. संतांच्या चरित्रांतील अभिजातपणावरून हें मत पाया धरतें.

हें सगळें विवेचन लक्षांत घेतल्यावर मनांत येतें, खरेंच, कसा अपेक्षावयाचा होता विजय महानुभावांनी महाराष्ट्रांत ! मग यापुढचा प्रश्न असा कीं, महाराष्ट्रसंस्कृतींत महानुभावांचें स्थान काय ? त्यास उत्तर असें कीं, जें मराठी भाषेंत आहे, तें महाराष्ट्रसंस्कृतींतीलच म्हटलें पाहिजे. कांही अपवाद सोडल्यास महानुभाव तत्त्वज्ञानास 'चक्रधर-दर्शन' म्हणावयास हरकत नसावी; कारण त्यांचीं गृहीतें धरल्यास त्यांचे सिद्धान्त बरोबर निघतात, असें वाटतें.

पण तें सर्व या लेखाच्या कक्षेबाहेर जाईल. कोणतें तत्त्वज्ञान खरें होतें किंवा खोटें होतें, आणि बरें काय व वाईट काय, हें तूर्त बाजूस ठेवून, महानुभाव मागे कां पडले, या प्रश्नाचीच चर्चा करण्यासाठीं हा लेख शास्त्रीय दृष्टिकोनांतून लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. यांत नवीन कांही आहे कीं नाही तें सुज्ञतज्ज्ञांच्या ध्यानांत येईलच.

( या लेखांतील अवतरणें प्रा. कोलते यांच्या 'महानुभाव तत्त्वज्ञान' व 'महानुभावांचा आचारधर्म' या ग्रंथांतील व मूळ पोथ्यांतील आहेत. )

[ टीपः—म. वा.–महावाक्य; म. वा. प्र.–महावाक्य प्रमेय; वि.–विचार, आ. मा.—आचार मालिका, ली. च.–लीळा चरित्र, शो. आ. मा. —शोधनीची आचारमालिका, म. त.–महानुभाव तत्त्वज्ञान, म. आ.–महानुभावांचा आचारधर्म, प्र.–प्रकरण. ]

# — २ —

# केशवसुत

## ( पूर्वार्ध )

## केशवसुतांचें अंतरंग

केशवसुत हे आधुनिक मराठी काव्याचे आद्य प्रवर्तक होत, हें सत्य आता प्रस्थापित झालें आहे. त्यांच्या या मोठेपणाविषयी जो वाद होता तो संपून आता बरेच दिवस झाले आहेत, असें म्हणायलाहि हरकत नाही. उलट आता 'केशवसुतांनी आपलें छायाचित्र कां बरें काढूं दिलें नाही?' अशी हळहळच सर्व मराठीप्रेमी माणसें व्यक्त करीत असतात. अर्थातच 'हें चित्र कुणाचें बुवा?' असें विचारलें जाण्यापेक्षा 'यांचें छायाचित्र कां बरें नाही?' हें विचारलें जाणें किती चांगलें आहे, हें कांही सांगायला नको.

केशवसुतांच्या या मोठेपणाचें नेमकें रहस्य काय, हा विचार साहजिकच मनांत येतो. काव्यक्षेत्रांत कां होईना, केशवसुतांनी परिस्थिति घडवली की परिस्थितीने त्यांना बनविलें? व्यक्ति मोठी की कालाचें माहात्म्यच मोठें? साहित्यशास्त्रामध्ये या प्रश्नाची चर्चा सर्वत्र होत असते. आणि हा प्रश्न खरोखरच महत्त्वाचा आहे यांत शंका नाही. केशवसुतांच्या बाबतींत या प्रश्नाचें उत्तर 'कालमाहात्म्यच मोठें' असें आजपर्यंतच्या टीकाकारांनी दिल्याचें दिसतें.

केशवसुतांनी ज्या कालीं काव्य लिहायला प्रारंभ केला, तो काळ अतिशय विलक्षण होता, असेंच कुणीहि म्हणेल. एवढें मोठें १८५७ चें स्वातंत्र्ययुद्ध! पण तेंहि जणू कांही दुसऱ्या जगांतून येणाऱ्या ताम्रमुखी मूठभर लोकांनी मोडून काढलें होतें, आणि खुंटी हलवून बळकट करावी तसा आपला पाय या खंडप्राय देशांत पक्का रोवला होता. महाराष्ट्राने जें पारतंत्र्य इकडेतिकडे पाहिलें होतें, त्यापेक्षा हें पारतंत्र्यहि 'अपूर्व' होतें. सुखाचा बुरखा घेऊन तें आलें होतें. पंचमहाभूतां-वरील ह्या राज्यकर्त्यांचें प्रभुत्व पाहून अल्पज्ञ जनता, आणि साहित्य व विज्ञान या

क्षेत्रांत त्यांनी निर्माण केलेले मेरुमांदार, प्रतिसृष्टि, पाहून सुंश बनता दिपून आणि दडपून गेली होती. काव्याच्या प्रांताविषयी बोलायचें तर आंग्ल कवींनी केलेली विपुल, विविध आणि चित्रविचित्र काव्यरचना पाहून सुशिक्षित काव्यप्रेमी मोहून गेले. त्या कवींचे जीवनविषयक निरानिराळे दृष्टिकोन, त्यांचीं वेगवेगळीं भावानुकूल वृत्तें, विशेषतः त्यांच्या काव्यांत येणारीं अनेक प्रकारचीं मनमोकळेपणाने केलेलीं प्रणयवर्णनें, हें सर्व पाहून ती मधल्या स्थितींतील पिढी आश्चर्यमुग्ध झाली. हें जग मोहक तर खरेंच; पण या मोहकतेला नाविन्याची आणि अगदीं निराळेपणाची जोड मिळून एक त्रिवेणी संगम तयार झाला होता. याच त्रिवेणी संगमांत आधुनिक मराठी कवितेचा जन्म आहे, आणि तिचे जनक केशवसुत हे आहेत, असा आजपर्यंतचा रूढ समज दिसतो. हा संगम झालाच होता, त्याच वेळीं केशवसुत पुढे आले, आणि जें इंग्रजींत असें होतें तें मराठींत त्यांनी तसें केलें, स्वतःच्या विशिष्ट वृत्तीमुळे त्यांना तें जमलें, हेंच त्यांचें क्रांतिकारकत्व, हाच त्यांचा मोठेपणा, म्हणूनच त्यांना आधुनिक मराठी कवितेचे आद्य प्रवर्तक म्हणायचें, असा आजवरचा सूर आहे.

'केशवसुतांच्या मृत्यूची बातमी ऐकून टिळक उद्गारले, "आपल्यांतला वर्ड्स्वर्थ आज गेला!" ' असें प्रा. मं. वि. राजाध्यक्ष यांनी नमूद केलें आहे. 'अवतरुनी फिरुनी शेले! केशवसुत गाउनि गेले!' असें आपल्याला त्यांचा 'सच्चा चेला' म्हणविणाऱ्या गोविंदाग्रजांनी अभिमानाने लिहिलें. 'मराठीचा परिमल' दाखवतां दाखवतां श्री. दा. न. शिखरे लिहितात, 'हरिभाऊ आपटे, प्रा. वा. ब. पटवर्धन, किरात, विनायक वगैरे थोर थोर रसिकांनी त्यांना वर्ड्स्वर्थ, कीट्स्, शेले या आंग्ल कवींच्या उज्ज्वल मालिकेंत बसविलें.' केशवसुतांच्या या समकालिनांपेक्षा आजच्या टीकाकारांचा अभिप्राय कांही वेगळा नाही. या सर्वांत सगळ्यांत जास्त आकर्षक अभिप्राय कुणाचा असेल, तर तो म्हणजे श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांचा. 'गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता' या आपल्या लेखांत ते म्हणतात, " 'गोल्डन ट्रेझरी'तील कवितांतल्या कल्पना त्यांच्या बऱ्याच गीतांतून आणि सुनीतांतून प्रतिध्वनित झालेल्या आहेत; व त्यावरून असें दिसतें की त्या पुस्तकापलीकडे त्यांच्या इंग्रजी कवितेच्या व्यासंगाची मजल फारशी गेलेली नव्हती....... किंबहुना, त्यांच्या कवितेची एकंदर अंतर्बाह्य घडण ध्यानांत घेतली असतां, त्यांची प्रतिभा

हा इंग्रजी काव्यांचा प्रसव आहे, असेंच म्हणावें लागेल.... बायरन्, शेले, कीट्स् प्रभृतींची प्रणयमंदिर कविता वाचून तत्कालीन तरुण पिढींत ज्या भावना आणि वासना निर्माण झाल्या, त्यांच्या विचारांत आणि वृत्तींत जी उत्कंठा आणि अतृप्तता उत्पन्न झाली, तिला केशवसुतांच्या कवितेच्या रूपाने वाचा फुटली....'' इत्यादि इत्यादि. प्रसिद्ध टीकाकार प्राध्यापक श्री. रा. श्री. जोग 'केशवसुत' या ग्रंथांत म्हणतात, "मराठी कवितेने जुनें वळण सोडून इंग्रजी वळण स्वीकारलें असें या क्रांतीचें स्थूलमानाने वर्णन केलें, तर या क्रांतीचें श्रेय केशवसुतांना देण्याची पटवर्धनांना अडचण वाटण्याचें कारण नव्हतें. कारण ते स्वतःच म्हणतात त्याप्रमाणे 'इंग्रजी वळणाची, कमीअधिक स्वतंत्र, जिव्हाळ्याची, भावगीतात्मक रचना करणारांमध्ये केशवसुत अग्रेसर होते.' '' इंग्रजी काव्याच्या संपर्काने मराठी काव्यांत कांही क्रांति केव्हा ना केव्हा होणारच होती; केशवसुत हे या क्रांतीचे निमित्त झाले, अशा आशयाचें विवेचन प्रा. जोग यांनी केलें आहे. 'मराठी साहित्याची रूपरेषा' पाहतांना प्राध्यापक डॉ. वि. पां. दांडेकर लिहितात, 'वर्ड्स्वर्थ, शेली, कीट्स् यांच्या काव्यवाचनाने नवीन मराठी कवींनी सृष्टिविषयक कविता लिहायला सुरुवात केली. केशवसुतांनी त्याच पद्धतीचा अवलंब करून सुमारें वीस निसर्गविषयक कविता लिहिल्या आहेत. '' त्यानंतर 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास' लिहिणारे प्राध्यापक डॉ. अ. ना. देशपांडे म्हणतात, "इंग्रजी कविता वाचून केशवसुतांनी मराठी कवितेला पूर्णपणें नवीन आणि जुन्या मराठी कवितेला सर्वस्वीं अपरिचित असें वळण लावलें; आशयाच्या आणि अभिव्यक्तीच्या पद्धतीच्या बाबतींत त्यांनी मराठी कवितेंत अभूतपूर्व स्वरूपाची क्रान्ति घडवून आणली, ही गोष्ट वादातीत आहे."

हें सर्व वाचून स्वतः केशवसुतांना काय वाटलें असतें, असा विचार मनांत येतो, तेव्हा त्यांना हें आवडलें नसतें असेंच वाटतें. याचें कारण केवळ विनय हें नव्हे, तर वस्तुस्थिति तशी नाही, हें होय. '**माझ्या तुर्मुखल्या मुखामधुनिया बालवयाचा पुडे! आहे सुन्दर तो सदा सरसवाङ्निष्यन्द चोहींकडे! तुम्ही नाहि तरी सुतादि तुमचे घातील तो प्राशुनी!**' असें आपण आपल्या प्रतिभेच्या आणि चिंतनाच्या बळावर म्हटलें तें खरें झालें हें पाहून एकीकडे समाधान वाटत असतांनाच, आपल्या भूमिकेविषयी लोकांचा झालेला हा समज पाहून

त्यांच्या हळव्या जीवाला दुःख झालें असतें, आणि मग त्यांनी कांहीसे पुढील स्वरूपाचे उद्गार काढले असते—' **ज्याला मी मुकलों विषाद मजला त्याचा मुळींही नसे । जें पृथ्वीवर आणिलें जन तया धिक्कारिती हा ! कसे !** '

**' जें रम्य तें बघुनिया मज वेड लागे**
**गाणें मनांत मग होय सवेंचि जागें '**

ही केशवसुतांची वृत्ति होती. कोणत्याहि कवीची वृत्ति अशीच असणार की, ' उत्कट भव्य तें घ्यावें मिळमिळीत अवघेंचि टाकावें ! ' त्या वेळीं डोळ्यांसमोर ' दिव्य ' काय होतें, तर तें म्हणजे इंग्रजी काव्य; त्यामुळेच केशवसुतांच्या मनांत गाणें जागें झालें, असें वरील विवेचकांना वाटतें. इंग्रजी काव्य हेंच त्यांचें स्फूर्तिस्थान आहे, असें या विवेचकांचें मत आहे. पण थोर कवीची दृष्टि आपल्या काळापुरती मर्यादित नसते, वस्तूंचें अंतरंग भेदून ती जाते, ग्राह्य काय आणि त्याज्य काय हें तिला समजतें. केशवसुत हे या कोटींतले कवि होते. ' दिक्कालांतुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके ' हा त्यांचा आत्मविश्वास होता, ' काचेमधूनी दिसतें जनाला । धोंड्यामधूनीहि दिसें कवीला ! ' ही अलौकिक जाणीव त्यांना झालेली होती, आणि ' फोलें पाखडितां तुम्ही, निवडितों तें सत्त्व आम्ही निकें ' ही आपल्या बुद्धीविषयी त्यांची निश्चितता होती. ' मळयास माझ्या कुंपण पडणें अगदीं न मला साहे,' असें म्हणणाऱ्या या कवीची दृष्टि कोणत्याहि प्रकारें संकुचित होती असें वाटत नाही. केशवसुतांची वाणी इतकी जिवंत वाटते की, ' वाचलें इंग्रजी काव्य की लिहिलें मराठी ' हें असेंच केवळ त्यांनीं केलें असेल यावर विश्वासच बसत नाही.

इंग्रजांच्या तेजाने भांबावलेल्या आणि त्यांच्या किंवा त्यांच्या वाङ्मयाच्या भाट बनलेल्या पिढीचे, त्या मधल्या स्थितीचे प्रतिनिधि केशवसुत होते, असें गृहीत धरणें चुकीचें होईल, असें वाटतें. केशवसुत हे खरेखुरे कवि होते. त्यांची बुद्धि जागरूक होती आणि भोवतालच्या घटनांचे पडसाद त्यांच्या हृदयाच्या सतारीवर उमटून काव्यरूपाने त्यांचे ध्वनि बाहेर पडत होते. कवि हा द्रष्टा असला पाहिजे, ही त्यांच्या मनांत दृढमूल कल्पना होती, ती कांही उसनी वाटत नाही. सभोवतालीं पाहतांच—

**‘ सोन्याचे सरले अहा ! दिवस ते आली निशा ही कशी**
**सौख्याचा नद तो सुकून पडलों या दुःखपंकीं फशीं !**
**कालक्रीडित हें बघून रडला, हें व्यस्त कांहीं नसे; ’**

अशी त्यांची मनाची अवस्था दुःखमय झाली. पण लगेचच त्यांच्या लक्षांत आलें की,—

**‘ आता जात असे दुरी शिथिलता अस्मत्समाजांतुनी,**
**याची खूणच गान जें निघतसें तें साच जाणा मनीं;**

परिस्थिति बदलत जाणार आहे ’. या बदललेल्या परिस्थितीचे प्रतिनिधि केशवसुत होते, असें म्हटलें असतां तें शोभून दिसेल. सबंध समाज कदाचित् झोपला असेल, तो मृतवत् भासत असेल, पण त्याचें चलनवलन अगदींच संपलें आहे असें नाही. आणि म्हणून कुंभकर्णाला घोर निद्रेंतून जागे करण्याचे निरनिराळे प्रयोग चालू असतांना संगीताने तो जागा झाला असें म्हणतात, त्याप्रमाणे आपणहि आपलें काव्य आपल्या समाजाला जागें करण्यासाठी गावें, असा विचार त्यांच्या मनांत आला असणें अगदी स्वाभाविक आहे. म्हणूनच ते म्हणतात,—

**‘ द्या उत्तेजन हो कवीस, न करा गाणें तयाचें मुकें ’** आणि म्हणूनच त्यांनी स्फूर्तीने तुतारी फुंकली, हातांत उंच निशाण धरलें आणि नवे शिपाई बनण्याचें आवाहन समाजाला केलें !

केशवसुत मनाचे किती सरळ दिसतात, हें अगदी उघड आहे. जेव्हा जेव्हा त्यांनी भाषांतरें केलीं, तेव्हा तेव्हा बहुतेक स्थळीं त्यांनी ऋणनिर्देश केला आहे. यांत त्यांची अभिजात रसिकताच दिसून येते. केशवसुतांचें आयुष्य तें किती ! पण या आयुष्याच्या पूर्वभागांतच नव्हे, तर उत्तर भागांतहि मूळ कवितांचा उल्लेख त्यांनी निःसंकोचपणें केला आहे. मग मनांत असा विचार येतो की, वर उल्लेखिलेल्या टीकाकारांच्या मतें जर केशवसुतांच्यावर परकीय म्हणजे इंग्रजी भाषेचें इतकें मोठें ऋण आहे, तर केशवसुतांनी तें कुठे तरी कबूल केलें असेल, कुठे तरी त्यांनी आपल्या काव्यांत इंग्रजी भाषेची, इंग्रजी वाङ्मयाची स्तुति केली असेल ! या दृष्टीने पाहूं जातां हातीं काय लागतें ? अशी एक महत्त्वाची जागा आहे. ती म्हणजे ‘ ‘ पण लक्षांत कोण घेतो ? ’च्या कर्त्यास ’ ही त्यांनी लिहिलेली कविता.

**' यूरोपीय कथा-पुराण-कविता-ग्रन्थांतुनी वेचले,**
**ते आहेत कितीक थोर उमदे राऊत वाखाणिले '**

हे उद्गार स्पष्ट आहेत, हें खरें. पण त्याहूनहि जास्त स्पष्ट गोष्ट आहे ती ही की, त्यांना ' गर्व ' वाहावासा वाटतो तो या कादंबरीच्या कर्त्यांचा. ' दोन बाजी ' या कवितेचें ' मूळ ' म्हणून व्हिक्टर ह्यूगोची एक कविता दाखवून देण्यांत आली आहे. पण वीरश्रीची गोडी काव्यांत अनुभवावी अशी शिराणी ज्या कुणाच्या मनांत असेल, त्याला ही कविता स्फूर्तिदायक वाटेल यांत शंका नाही. केशवसुतांच्या मनांत हा विषय बऱ्याच पूर्वीपासून अस्वस्थता उत्पन्न करीत असला पाहिजे. आणि ही भावना व्यक्त होण्याच्या थराला पोचली असतांना, सौंदर्याचें मर्म ग्रहण करणाऱ्या त्यांच्या दृष्टीच्या आढळांत ह्यूगोची ती कविता आली असली पाहिजे. ह्या ठिकाणीं आविष्काराची पद्धति, बाहेरचा आकार, हा फार तर इंग्रजी कवितेच्या वाचनाने त्यांना सुचला असेल. पण ह्यूगोची कविता आवडल्याने असें कांही तरी मराठींत करावें अशी ईर्ष्या मनांत उत्पन्न होऊन मग ते हें काव्य करायला बसले असतील, असें वाटत नाही. या कवितेचा जिवंतपणा हीच याची साक्ष नाही काय ? ' हृदयांतुनि न जे बोल । निघती, ते सगळे फोल ' असें केशवसुतच म्हणत नाहीत काय ? प्रेरणा निर्माण करण्याचें कार्य हें ' तेथे पाहिजे जातीचें ' याच स्वरूपाचें नाही काय ? केवळ परकी पोषाख घातला म्हणजे माणूस परकी बनतो काय ? तात्पर्य, केशवसुतांची स्फूर्ति परकी वाटत नाही. ' सुनीत ' हा जो काव्यप्रकार केशवसुतांनी मराठींत नव्यानेच सुरू केला, त्यासंबंधानेदेखील हेंच म्हणावेंसें वाटतें. आपल्या वृत्तीला अनुकूल असणारे विचार आणि प्रकार त्यांनी संग्राहक वृत्तीने ग्रहण करून घेतले आणि आपल्या कौशल्याने ते व्यक्त केले. कुणी म्हणेल, हीच केशवसुतांनी केलेली क्रांति नव्हे काय ? पण, केशवसुतांची ही वृत्ति, त्यांचा मनःपिंड, कसा बनला होता, याचा एकदा शोध घेतला म्हणजे, एकटा सूर्य सर्व प्राणिमात्रांना चेतना देतो त्याप्रमाणे केशवसुतांच्या आवर्तीतील सर्व प्रश्नांचा उलगडा होईल !

**' तों मज गमलें विभूति माझी**
**स्फुरत पसरली विश्वामाजीं '**

हा दिव्य अनुभव केशवसुतांना आला होता. असेच पण क्षणांत नाहीसे

होणारे विविध भौस आत्मसात् करण्याची त्यांची तळमळ होती. ही विशालता, व्यापकता त्यांना हवी होती हें '**मळ्यास माझ्या कुंपण पडणें अगदीं न मला साहे! ...सर्वच मोठें—साधु—जवळ त्या सकळीं मी भरूनी राहें!**' इत्यादि चरणांवरूनहि स्पष्ट आहे. त्यांच्या मनांत हे विचार केवळ कवितेंत घालण्यासाठी आले नव्हते. ते त्यांच्या विशिष्ट वृत्तींतून स्फुरलेले होते. 'जया अंगीं मोठेंपण। तया यातना कठीण' हें त्यांना जाणवत असलेंच पाहिजे. अखिल विश्वाशीं एकरूप होण्याचा जगावेगळा आनंद उपभोगावयाचा असेल तर अखिल जगाचीं दुःखेंहि आधी जवळ केलीं पाहिजेत! पण, आतां काय करावें, मग काय करावें, हा प्रश्न तिथे नव्हता. अन्तःकरणप्रवृत्तीच तिथे प्रमाण होती.

यामुळेच केशवसुतांना 'अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न' डसला; 'मधुरावर उपासमारीची पाळी' आलेली पाहून त्यांचें हृदय व्याकुळ झालें; 'मुलास झोडपणाऱ्या एका पंतोजीस' पाहून 'खाटीक कां झाला नाहीस?' अशा शब्दांत विचारण्याइतका राग आला; आणि रूढिकाराक्षसीचे अत्याचार पाहून तर त्यांच्या मनांत कायमचाच कल्लोळ उठत राहिला. म्हणूनच त्यांनी समाजसुधारणेचें चित्र असें रंगविलें—

**सृष्टीने निज भृत्य एक बलवान् रूढीवरी प्रेषिला**
**त्याने कागद घेउनी सहज जे रूढीकडे फेंकिले,**
**त्यांहीं आसन तें तिचें डळमळूं आहे पहा लागलें!**

केशवसुतांना अभिप्रेत होती ती प्रामुख्याने समाजसुधारणा, त्यांना स्वातंत्र्य हवें होतें तें व्यक्तिस्वातंत्र्य; असेहि विचार प्रचलित असल्याचें कांही ठिकाणीं दिसतें. पण ही शंका टिकाऊ आहे असें वाटत नाही. जी व्यक्ति '**मळ्यास माझ्या कुंपण पडणें अगदीं न मला साहे।...अपुल्यामध्ये विश्व पाहुनी पूजीं मी विश्वाला!**' असें निर्भयपणें सांगते, ती राजकीय पारतंत्र्याविरुद्ध मूग गिळून बसेल हें शक्य तरी आहे का?

केशवसुतांना हें राजकीय दुःखहि उत्कटपणें होत होतें. '**देशाविषयी गोष्टी बोलत येथे। बसलों, विसरुनि कितीकदा निद्रेतें**' असें ते म्हणतात, या साऱ्या गोष्टी त्यांनी लिहून कां बरें ठेवल्या नाहीत? पार-